लेखक

शि. ल. करंदीकर,

एम्. ए., एलएल्. बी., एम्. एल्. ए.

— प्राप्तिस्थल —

ग. पां. परचुरे प्रकाशन-मन्दिर

गोरेगांवकर चाळ, क्र. २, मुंबई क्र. ४.

[ ९ ]

आवृत्ति १ ली
सन १९४७

मूल्य
१॥ रुपया

# प्रस्तावना

आजारीपणामुळें मी गेल्या पावसाळ्यांत अंथरुणावर पडून होतों. मुंबईचे श्री. गजाननराव परचुरे एकदां अचानकपणें माझ्या समाचारासाठीं आले. स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या Indian War of Independence या पुस्तकाचें मराठी भाषांतर त्या वेळीं केलें जात होतें व त्याच्या पहिल्या आवृत्तीच्या विक्रीचे संपूर्ण अधिकार आपल्याला मिळावे यासाठीं श्री. परचुरे खटपट करीत होते. या बाबतींत तयार झालेल्या कराराचा कच्चा मसुदा त्यांनीं मला दाखविला व त्याच चर्चेच्या ओघांत त्यांनीं मला 'सावरकरांचे सहकारी' या नांवाचें पुस्तक लिहिण्याबद्दल सुचविलें. सामान्यतः त्याच करारांतील अटींवर हें पुस्तक लिहिण्याचें मी मान्य केलें.

माझ्या आजारपणांतून मी लौकर उठेन असें मला त्या वेळीं वाटत होतें; पण, माझें आजारपण बरेंच लांबलें. त्यानंतर मी विधिमंडळाच्या कामासाठीं मुंबईस जाऊन राहिलों. या अवधींतहि मला लेखनाकडे लक्ष पुरवितां आलें नाहीं. पण, पुढें हळूहळू लिहिण्याला सुरुवात करून मी आज हें पुस्तक वाचकांच्या स्वाधीन करूं शकत आहें, याबद्दल मला आनंद वाटत आहे. श्री. गजाननराव परचुरे यांचे चुलते कै. बळवंतरावजी परचुरे यांचा व श्री. गजाननराव यांचे वडिलांचा मजवर लोभ होता व आहे. हा ऋणानुबंध श्री. गजाननरावहि पुढें चालवीत आहेत याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

या पुस्तकांत सावरकरांच्या तिघा सहकाऱ्यांची संपूर्ण जीवनकथा देण्यांत आली आहे. क्रांतिवीर बाबाराव सावरकर, सेनापति बापट, लाला हरदयाळ, मादाम कामा, बॅ. राणा या सहकारी-पंचकाची जीवनकथा याच पद्धतीनें सांगण्याचें माझ्या मनांत आहे. तो प्रयत्न मी लौकरच केव्हांतरी करीन. हें छोटें पुस्तक दि. २८ मे रोजीं प्रसिद्ध होऊं शकलें नाहीं, याला कारण परिस्थिति आहे. संकल्पित दिनांक साधला नाहीं तरी त्यानंतर शक्य तितक्या लौकर पुस्तक प्रसिद्ध करून वाचकांना दिलेलें वचन पाळण्याचा मी यथाशक्ति प्रयत्न करीत आहें. वाचकांनीं माझी आजवरची लेखनसेवा सहृदयपणानें गोड मानून घेतली आहे. आजची ही अल्प सेवाहि वाचक गोड मानून घेतील, असा विश्वास बाळगणारा,

दिनांक २६।६।४७.
३९१।१ सदाशिव पेठ, पुणें.

महाराष्ट्रीय वाचकांचा नम्र सेवक,
शिवराम लक्ष्मण करंदीकर

# अनुक्रम







# १. पं. शामजी कृष्णवर्मा

एकमेकांचे सहकारी म्हणून ज्या व्यक्तींचा निर्देश करावयाचा त्या व्यक्तींचें वय बरेंचसें सारखें असावें, त्यांच्या मनोरचनेंत पुष्कळसें साम्य असावें आणि त्यांच्या प्रवृत्तींचा तोंडावळा एकमेकांशीं जुळता असावा अशी ज्यांची अपेक्षा असेल, त्या लोकांना पं. शामजी कृष्णवर्मा हे स्वातंत्र्य-वीर सावरकर याचे सहकारी होते हें विधान चमत्कारिक वाटेल. पं. शामजी कृष्णवर्मा हे सावरकरांहून २६।२७ वर्षांनीं वडील होते. कवित्व व देशभक्ति हा सावरकरांच्या बालमहत्त्वाकांक्षेचाहि अंकुर होता; तर संस्कृत विद्येचा प्रभावी व्यासंग हा पंडितजींच्या महत्त्वाकांक्षेचा पहिला अंकुर होता. वयाला चाळीस वर्षें होईपर्यंत पंडितजींच्या मनःप्रवृत्तीला क्रांतिकारक राजकारणाचा स्पर्शहि झाला नव्हता; तर वयाचीं चाळीस वर्षें उलटण्याच्या कितीतरी अगोदर स्वातंत्र्यवीर सावरकर हे क्रांतिकारक राजकारणांतले अध्वर्यु म्हणून त्रिखंडांत विख्यात झालेले होते. असे ठळक भेद असूनहि, पं. शामजी कृष्णवर्मा यांना सावरकरांचे सहकारी म्हणून श्रेष्ठ स्थान देणें अत्यंत अवश्य आहे.

गुजराथ-काठेवाड भागांतल्या हिंदु समाजांत ज्या अनेक जमाती आहेत त्यातल्या भनसाळी जमातींत शामजी कृष्णवर्मा याचा जन्म कच्छमध्ये मांडवी या ठिकाणीं १८५७ च्या ऑक्टोबर महिन्यांत झाला. या ठिकाणीं शामजींचें प्राथमिक शिक्षण चाललें होतें, त्या संधीसच त्यांचे आईबाप वारले. इंग्रजी शिकावें अशी प्रबल उत्कंठा मनांत असल्यामुळें, पोरका झालेला हा मुलगा धडपडत मुंबईस आला. एका बाजूला इंग्रजी शाळेंत जाऊन नवी विद्या हस्त-गत करणाऱ्या या मुलानें फावल्या वेळेंत जुन्या पद्धतीनें संस्कृतचें अध्ययनहि सुरू ठेवलें. विल्सन हायस्कूल व एल्फिन्स्टन हायस्कूल या विद्यालयांत शिकून, शामजी १८७६ मध्यें प्रवेश परीक्षेला बसण्याच्या तयारींत होते; पण ऐन वेळीं डोळे बिघडल्यामुळें त्यांची परीक्षा हुकली ! शामजींच्या बरोबर एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें शिकत असलेले शेठ रामदास यांची बहीण भानुमती हिच्याशीं शामजींचा १८७५ मध्यें विवाह झाला.

प्रो. मॉनियर वुइल्यम्स हा इंग्रज त्या वेळीं संस्कृत भाषेचा पंडित म्हणून प्रसिद्ध होता. तो या सुमारास हिंदुस्थानांत आलेला होता. जुन्या पद्धतीनें संस्कृत पढलेला व इंग्रजीहि जाणणारा एकादा तरुण मॉनियर वुइल्यम्सला हवा आहे अशी माहिती शामजींना मिळाली. मॉनियर वुइल्यम्सनें आपल्याला पसंत करावें अशा महत्त्वाकांक्षेनें शामजी प्रेरित झाले. संस्कृतमधील पंडित म्हणून आपला लौकिक हिंदुस्थानभर पसरलेला असला तर मॉनियर वुइल्यम्सचें लक्ष आपल्याकडे चटकन वळेल अशा समजुतीनें शामजींनीं आर्य समाजाच्या प्रचारकाची भूमिका पत्करली व या नात्यानें त्यांनीं पंजाबपासून महाराष्ट्रापर्यंत दौरा काढला. मॉनियर वुइल्यम्स आपल्याला हाताशीं धरील अशी उमेद मनात धरून शामजी १८७९ च्या मार्च महिन्यांत इंग्लंडला गेले.

१८७९ च्या एप्रिल महिन्यांत शामजींनीं ऑक्सफर्ड येथील बेलियल कॉलेजात आपलें नाव दाखल केलें. येथून पुढील चार वर्षें या विद्यालयांत विद्यार्जन करून शामजी १८८३मध्ये बी.ए. झाले. 'भारतात लेखनकलेचा उदय' या विद्वत्तापूर्ण निबंधानें शामजींनीं १८८१ मध्यें युरोपियन पंडितांवर आपली छाप बसविली. मॉनियर वुइल्यम्सनें आरंभीं शामजींची उपेक्षा केली होती; पण, स्वतःच्या कर्तृत्वावर शामजींचें बस्तान बसूं लागलेलें दिसतांच त्यानें शामजींना मदत करण्याचा मोठेपणा घेतला. शामजींना या सुमारास कच्छ संस्थानांतून जी एक चांगली शिष्यवृत्ति मिळूं लागली ती मिळण्याला मॉनियर वुइल्यम्सचे श्रमहि अंशतः कारणीभूत झाले. युरोपात या काळांत ज्या प्राच्य विद्याविशारदांच्या परिषदा झाल्या त्यांतल्या कांहींना पंडितजी उपस्थित होते व या कामीं त्यांना सरकारी अधिकाऱ्यांचें प्रोत्साहन मिळालें. बी.ए. झाल्यावर वर्षाभरांत बॅरिस्टर होऊन पंडित शामजी कृष्णवर्मा १८८५ च्या सुरुवातीस स्वदेशीं परत आले.

यापुढील सुमारें एक तप पंडितजींनीं वकिली करण्यांत व नोकरी करण्यांत घालविलें. रतलाम, उदेपूर, जुनागड इत्यादि संस्थानांत महत्त्वाचीं कामें करण्यात पंडितजींनीं ८।९ वर्षें घालविलीं व उरलेलीं २।३ वर्षें त्यांनीं अजमीर येथें वकिली करण्यांत घालविलीं. या सर्व अवधींत पंडितजींनीं चांगला द्रव्यसंग्रह केला आणि बराचसा पैसा किफायतशीर शेअर्समध्ये गुंतवून त्यांनीं कायमच्या उत्पन्नाची तरतूद करून ठेवली. रतलाम व उदेपूर या दोन्ही

ठिकाणच्या संस्थानिकांच्या मनांत पंडितजींबद्दल आदर वसत असल्यामुळें, संस्थानच्या सेवेंतून पंडितजी निवृत्त झाले तेव्हां या संस्थानिकांनीं त्याना भरपूर पैसा दिला. पंडितजी जुनागड येथील नोकरींत होते त्या काळात त्याचा ब्रिटिश नोकरशाही व हिंदुस्थान सरकारचें 'पोलिटिकल' खातें याच्याशीं बराच संघर्ष झाला. हिंदुस्थानांतील ब्रिटिश राजनीतीचें सत्यस्वरूप लक्षांत घेऊन पंडितजी राजकारणांतल्या जहाल मतप्रवाहाकडे वळले. याला संस्थानी नोकरींतला त्याचा विविध प्रकारचा अनुभव कारणीभूत झाला.

संस्थानी सेवेंतून निवृत्त झालेला व जहाल राजकारणाकडे वळूं पाहणारा शामजींसारखा प्रतिष्ठित विद्वान् आपल्या कळपांत सामील झाला तर फार बहार होईल असें 'थिऑसफी' या नवोदित मतपंथाच्या धुरीणाना वाटूं लागलें. पण हा नवोदित मतपंथ भारतांतल्या ब्रिटिश वर्चस्वाचा प्रच्छन्न पुरस्कर्ताच आहे अशी पंडितजींची समजूत झालेली असल्याकारणानें, त्यांना थिऑसफीचें वावडेंच वाटलें. आपल्या पुढील उद्योगाचें संशोधन पंडितजी करीत होते त्या सुमारास महाराष्ट्रांत कित्येक अकल्पित घटना घडल्या. प्लेगच्या धामधुमींत गोऱ्या सोजिरांनीं पुण्याच्या नागरिकाचा जो छळ केला त्याचा प्रतिशोध म्हणून पुण्याच्या चाफेकर बंधूंनीं रँड व आयर्स्ट या दोघा साहेबाचा वध केला. लोकक्षोभाची मजल या टप्प्यापर्यंत गेली असें पाहून चिडून गेलेल्या सरकारनें लोकनायक टिळक यांच्यावर राजद्रोहाच्या आरोपावरून खटला भरला व त्याना कारागृहांत डांबून टाकलें. जहाल राजकारणी मतांचा प्रसार करण्याच्या दृष्टीनें परतंत्र भारतांतलें वातावरण अनुकूल नाहीं, तो मतप्रसार इंग्लंडमधील स्वतंत्र वातावरणांतूनच अधिक सुलभतेनें व अधिक प्रभावशालीपणानें करतां येईल असा बोध पंडितजींनीं टिळकांच्या उदाहरणावरून घेतला. या कार्यासाठीं इंग्लंडांत कायमचेंच वास्तव्य करण्याच्या इराद्यानें पंडितजींनीं १८९७ च्या मध्याच्या सुमारास स्वदेशाला रामराम ठोकला.

संस्थानी नोकरींत शिरताना पंडितजी हे सौम्य राजकारणाचे उपासक होते. त्यांनीं इंडियन नॅशनल काँग्रेसशीं प्रत्यक्ष संबंध ठेविला नव्हता; पण तिची तत्कालीन विचारसरणी आणि पंडितजींची विचारसरणी यांमध्यें तेव्हा फारसें अंतरहि नव्हतें. संस्थानी नोकरींत असताना पंडितजींना ब्रिटिश राजकारणाचें

पाताळयंत्री स्वरूप चांगलें समजूं लागलें. एरवीं मोठ्या सौजन्यानें वागणारा इंग्रज आपला राष्ट्रीय स्वार्थ साधतांना हिंदी माणसाशीं कसा वागतो व या वागण्याला त्याचे जातभाई कसे एकलाग उचलून धरतात याचा अनुभव या अवधींत पंडितजींना चांगल्या प्रकारें आला. इंडियन नॅशनल कॉंग्रेसच्या मिळमिळीत व पडखाऊ राजकारणापेक्षां अधिक तेजस्वी राजकारणाची मुहूर्त-मेढ रोवणाऱ्या टिळकाचा व पंडितजींचा या काळात परिचय घडून आला. टिळकांवर सरकारनें शस्त्र उगारलें तसेंच जहाल राजकारणाचा पुरस्कार आपण करूं लागलों तर आपल्यावरहि शस्त्र उगारण्यात येईल व आपल्या संकल्पित प्रचारकार्यांत खंड पडेल; त्यापेक्षा इंग्लंडमध्यें वास्तव्य करून प्रचारकार्य अखंडपणें चालू ठेवणें अधिक श्रेयस्कर, असा विचार करून पंडितजींनीं इंग्लंड गांठलें.

त्या काळांतहि इंग्लंडमध्यें हिंदी राजकरण चर्चिलें जात असे; पण या चर्चेला मर्यादा होत्या. ह्यूम–वेडरबर्न प्रभृति इंग्रज हेच इंडियन नॅशनल कॉंग्रेसचे त्या वेळीं अधिदेव होते. त्यामुळें त्यांना हवी ती व हवी तेवढीच चर्चा त्या वेळीं इंग्लंडांत केली जात असे. इंग्रजाच्या लोकसभेंत प्रवेश करून भारतीय राजकारणातल्या विपथाची चर्चा करणारा व हिंदी लोकांना होत असलेल्या अन्यायांना मुद्देसूद रीतीनें व समतोलपणानें वाचा फोडणारा हिंदी नेता म्हणून दादाभाई नौरोजी यांनाहि पुष्कळ मान्यता प्राप्त झालेली होती. इग्लंडात येणारे व राहाणारे हिंदी लोक ह्यूम–वेडरबर्न, दादाभाई नौरोजी इत्यादींच्या मार्गानेंच राजकारणाची वाट चालण्यांत धन्यता मानीत असत. इग्लंडांत येऊन राहिल्यावर पंडितजी प्रथमप्रथम याच मेळाव्यात सामील झाले. पण पंडितजींच्या घरीं चालणारें अघळपघळ आतिथ्य व अव्वडचव्वड चर्चा याचा परिणाम हळूहळू दिसूं लागला. पंडितजींचें निवासस्थान हें भारतीय राज-कारणाच्या चर्चेचें एक महत्त्वाचें स्थान बनलें व पंडितजींभोंवतीं अनेक लोक गोळा होऊं लागले.

आयर्लंड, ईजिप्त प्रभृति ब्रिटिश–अंकित देशांतून चाललेल्या राजकीय चळवळींच्या स्वरूपाकडे व मार्गाकडे पंडितजींचें लक्ष हळूहळू वळूं लागलें. मिल्सस्पेन्सर प्रभृति पंडितांनीं प्रतिपादलेल्या उदार व उदात्त सामाजिक नि राजकीय तत्त्वज्ञानाचा तोंडभर पुरस्कार करणारे इंग्रज व्यवहाराची वेळ

येतांच कसे कठोर व स्वार्थी बनतात याचें प्रत्यक्ष उदाहरण त्या वेळीं सुरू असलेल्या बोअर युद्धामुळें जगापुढें नांदत होतें. पंडितजी तिकडे लक्ष देत होते. त्या वेळीं दक्षिण आफ्रिकेंत असलेले गांधीजी एका बाजूनें बोअर लोकांबद्दल सहानुभूति व्यक्त करीतकरीत दुसऱ्या बाजूनें ब्रिटिशांना मदत करीत आहेत हें पाहून त्याना अनावर संताप येत होता. राजकारणी चर्चा करण्यांत व लागेबांधे जुळविण्यांत गढून गेलेले शामजी खरोखरच पंडित होते हें या सुमारास घडलेल्या एका गोष्टीवरून लोकनिदर्शनास आलें. १९०३ च्या शेवटीं हर्बर्ट स्पेन्सर हा तत्त्वज्ञानी पंडित इहलोक सोडून गेला तेव्हां, त्याच्या स्मशानयात्रेला उपस्थित असलेल्या शामजींनीं स्पेन्सरच्या स्मरणार्थ एक हजार पौंडाची देणगी जाहीर केली व या देणगीचा विनियोग ऑक्सफर्ड विद्यापीठामार्फत केला जावा अशी इच्छा त्यानीं व्यक्त केली.

हर्बर्ट स्पेन्सर यांच्याच नांवाची ट्रॅव्हलिंग फेलोशिप घोषित करून पंडितजींनीं हिंदी तरुण युरोपकडे आकृष्ट करण्याचा अभिनव उपक्रम याच सुमारास केला. स्वामी दयानंद या आर्यसमाज संस्थापकाच्या नावानेंहि त्यानीं एक शिष्यवृत्ति जाहीर केली. पंडितजींचे एक मित्र बॅ. सरदारसिंगजी राणा यांनाहि हा उपक्रम अनुकरणीय वाटला व त्यानीं १९०५ च्या शेवटीं राणा प्रताप व छत्रपति श्रीशिवाजी महाराज या विभूतींच्या नावानें दोन शिष्यवृत्त्या जाहीर केल्या. यापैकीं शिवाजी शिष्यवृत्ति मिळवून स्वातंत्र्यवीर सावरकर हे १९०६ च्या मध्याच्या सुमारास इंग्लंडला गेले. शिष्यवृत्त्या मिळवून इंग्लडात येणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांची रहाण्याची व्यवस्था चांगल्या प्रकारें व्हावी व इंग्लिश जीवनाचा त्यांच्या जीवनावर विपरीत परिणाम होऊं नये या हेतूनें शामजींनीं १९०५ च्या जुलै महिन्यांत 'इंडिया हाऊस' हें छात्रालय लंडनमध्यें सुरू केलें.

१९०५ सालीं पंडितजींनीं 'इंडियन सोशिऑलॉजिस्ट' या नांवाचें इंग्रजी मासिक सुरू केलें. या मासिकाचें मासिक मूल्य केवळ एक पेन्स ठेवण्यात आलें होतें. नव्या नव्या कल्पना प्रसृत करण्याला, नवे नवे उपक्रम रूढ करण्याला व राजकीय प्रश्नांची चर्चा निर्भयपणें, तत्त्वशुद्ध रीतीनें व तर्कशुद्ध पद्धतीनें करण्याला हें मासिक पंडितजींना या पुढील कांहीं वर्षे फार उपयोगी पडलें. जहाल राजकीय विचारांचा उहापोह करण्यासाठीं नवी नवी

तरुण मंडळी आपल्याभोंवतीं गोळा होऊं लागली आहे असा विश्वास वाटूं लागतांच पंडितजींनीं १९०५ सालीं 'इंडियन होमरूल सोसायटी' या नांवाची संस्था स्थापून आपल्या राजकारणी वैशिष्ट्याला संघटित स्वरूप आणून दिलें. 'गॅलिक अमेरिकन' हें अत्यरिश रिपब्लिकन पक्षाचें पत्र या पूर्वीच न्यूयॉर्कमधून प्रसिद्ध होऊं लागलें होतें. त्याचाहि आपल्या मत-प्रचाराच्या कामीं उपयोग करून घेण्याला पंडितजी चुकले नाहींत.

१९०६ च्या मध्याच्या सुमारास सावरकर इंडिया हाऊसमध्यें येऊन राहिले व हळूहळू त्यांच्या सशस्त्र क्रांतिवादाची छाप भोंवतालच्या मंडळीवर पडूं लागली. या सुमारास हिंदुस्थानात वंगभंगाची चळवळ सुरू होऊन जहाल राजकारणाला खूप भरती आली होती. १८५७ सालीं करण्यांत आलेला भारतातला सशस्त्र क्रांतीचा प्रयत्न इंग्रजांच्या अद्याप स्मरणांत होता. त्या प्रयत्नाला अर्धशतक होण्याच्या सुमारासच ही नवी चळवळ सुरू झाल्याकारणानें, इंग्रज मुत्सद्दी कांहींसे भांबावून गेले होते व त्यांनीं हिंदुस्थानांतली चळवळ जमीनदोस्त करण्यासाठीं दडपशाहीला प्रारंभ केला होता. कसलाहि आडपडदा न ठेवतां पंडितजी सशस्त्र क्रांतिवादाचा पुरस्कार करूं लागले त्या सुमारास इंग्रज सरकारनें त्या वेळचे लोकप्रिय पुढारी लाला लजपतराय व सरदार अजितसिंग यांना हद्दपार केलें. या घटनेचा पंडित-जींच्या मनावर बराच परिणाम झाला. इंग्लंडमध्यें राहण्यापेक्षां फ्रान्समध्यें राहणें अधिक सुरक्षित व फलदायक असें त्याना वाटूं लागलें. सावरकरप्रभृति तरुण मंडळी इंग्लंडमधील कार्य करण्याला समर्थ आहेत असा विश्वासहि त्यांना वाटूं लागला होता. म्हणून, १९०७ च्या मध्याच्या सुमारास इंग्लंडला रामराम ठोकून पंडितजी कायमच्या वास्तव्यासाठीं फ्रान्सला निघून गेले.

आपल्या राजकीय मतांचा प्रचार हिंदुस्थानांत सर्वत्र व सतत चालावा असें पंडितजींना या सुमारास वाटूं लागलें. हें प्रचारकार्य म्हणजेच आपलें जीवितकार्य असे मानणारे मिशनरी किंवा महंत निर्माण करण्याची व त्यांच्या योगक्षेमाची व्यवस्था करून त्यांना सतत हिंडत ठेवण्याची योजना आखून व या योजनेप्रीत्यर्थ आपण किती पैसे खर्च करावयाचे हेंहि निश्चित ठरवून पंडितजींनीं आपलें सगळें म्हणणें लोकमान्य टिळक यांना कळविलें व या योजनेला मूर्तस्वरूप देण्याचें उत्तरदायित्व त्यांनीं टिळक, बिपिनचंद्र

पाल व दादासाहेब खापर्डे यांच्यावर सोंपविलें. अनेक हिंदी संस्थानिकांशीं प्रतिष्ठेनें वागलेले, अनेक देशी संस्थानांत महत्त्वाचीं कामें केलेले पंडितजी भारताच्या भावी राजकीय उत्क्रांतींत देशी संस्थानांना किती महत्त्व आहे हें पुरतेपणीं जाणत होते. संस्थानांच्या कारभारांत तत्काळ कोणते बदल होणें अवश्य आहे याचें विवरण ते या सुमारास आपल्या मासिकातून करूं लागले; आणि बडोदा नरेश श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांच्या ठिकाणीं असलेले अनेक श्रेष्ठ गुण हेरून पंडितजी त्यांच्याशीं संघानें जोडूं लागले. स्वतंत्र व संयुक्त भारत हे पंडितजींच्या राजकीय आकांक्षाचें पर्यवसान असल्यामुळें भारताचा $\frac{1}{3}$ मुलूख व भारतीय प्रजेपैकीं $\frac{1}{4}$ प्रजा ज्या संस्थानातून नादते त्या संस्थानांकडे त्यांचें दुर्लक्ष होणें शक्य नव्हतें !

शामजी लंडन सोडून पॅरिसला गेले त्या सुमारासहि त्याचा मतप्रचार व त्यांच्या प्रभावळींतल्या लोकांचे उद्योग यांचा चटका इंग्रजाच्या मनाला कसा जाणवूं लागला होता हें १९०७ च्या जुलै महिन्याच्या शेवटींशेवटीं ब्रिटिश पार्लमेंटमध्यें शामजी व त्याचें मासिक 'इंडियन सोशिऑलॉजिस्ट' याच्याविषयीं विचारण्यांत आलेले प्रश्न व त्याना भारतमंत्री मोर्लेसाहेब यानीं दिलेलीं उत्तरें यावरून स्पष्टपणें लक्षांत येतें. शामजी, त्याचा मतप्रचार व त्याच्या प्रभावळींतल्या माणसाचे उद्योग यांच्या नावानें जळफळत राहणें हा उद्योग ब्रिटिश पार्लमेंटांतले कांहीं सभासद व अनेक प्रमुख ब्रिटिश वृत्तपत्रें यांनीं या वेळीं सुरू केला व तो उद्योग त्याना यापुढें सुमारें तीन चार वर्षे चागलाच पुरवला ! १९०७ च्या ऑगस्टमध्यें जर्मनींतल्या स्टूटगार्ट शहरीं भरलेल्या आंतरराष्ट्रीय समाजसत्तावाद्यांच्या मेळाव्याला हिंदी प्रतिनिधी म्हणून मादाम कामा आणि बॅ. सरदारसिंगजी राणा हीं उपस्थित होतीं. पंडितजी जातीनें या मेळाव्यासाठीं पॅरिस सोडून गेले नव्हते हें खरें; पण या मेळाव्यासाठीं हिंदी प्रतिनिधी धाडण्याच्या कल्पनेपासून जे अनेक उद्योग या निमित्तानें करावे लागले त्या सगळयात पंडितजींच्या पुरस्काराला व सल्लामसलतीला फार महत्त्व होतें, हेंहि तितकेंच खरें आहे !

१९०७ च्या मे महिन्यांत हिंदुस्थान सरकारनें दडपशाहीला सुरवात केली आणि लाला लजपतराय व सरदार अजितसिंग यांना हद्दपार केलें. याचें कारण असें होतें कीं, १८५७ च्या स्वातंत्र्यसंग्रामाला पन्नास वर्षे

पुरीं होत आहेत या गोष्टीचें स्मरण ठेवून हिंदी लोक तसाच कांहीं प्रयत्न फिरून करतील अशी भीति सरकारी अधिकाऱ्यांच्या मनाला सतत भेडसावीत होती. सरकारी दडपशाहीचा परिणाम म्हणून कांहीं साहसी हिंदी तरुण गुप्त संघटना व क्रांतिकारक तत्त्वज्ञान यांचे भोक्ते बनले. या साहसी तरुणांच्या विचारसरणीचें समर्थन करणें व त्यांना प्रोत्साहन देणें या गोष्टी पुढाऱ्यांच्या कार्यक्षेत्रांतल्या होत्या व पंडितजींनीं हें कार्य अत्यंत निर्भयपणें चालविलें होतें. १९०७ च्या शेवटीं सुरत येथें इंडियन नॅशनल कॉंग्रेसचें अधिवेशन झालें व त्यात टिळक पक्ष व फेरोजशहा मेथा पक्ष यांची खडाजंगी होऊन कॉंग्रेसच्या प्रत्यक्ष कामात बखेडा माजला. या घटनेचा खरा अर्थ काय हें पंडितजी स्पष्टपणें व अचूकपणें ओळखीत होते व हा अर्थ आपल्या मासिकाच्या द्वारा विवरून सांगण्याला ते कचरत नव्हते. भारतांतल्या कांहीं भागातले साहसी तरुण व इंग्लंडमध्यें विद्यार्जनासाठीं म्हणून आलेले अनेक भारतीय तरुण संघटित प्रयत्न करून सशस्त्र क्रांतीचे उद्योग आंखण्यांत कसे रंगून गेलेले आहेत, हें पंडितजींना विदित होतें. त्यामुळें, १९०८च्या एप्रिल महिन्याच्या शेवटीं खुदीराम बसू या बंगाली तरुणानें मुझफरपूर शहरांत बॉंबचा पहिला धडाका उडवून दिला तेव्हां पंडितजींना आश्चर्य तर वाटलेंच नाहीं; राज्यकर्त्यांच्या अरेरावी वर्तनाचा हा निसर्गसिद्ध असा परिमाण आहे हें ओळखून त्यांनीं घडलेल्या गोष्टींचें छातीठोकपणानें समर्थनच केलें.

ईजिप्त, अरबस्थान, इराण वगैरे इस्लामी देशांतल्या राजकीय घडामोडींकडे पंडितजींचें लक्ष असे व या सर्व देशातल्या घडामोडींचें स्पष्टीकरण ते आपल्या मासिकांतून आपल्या पद्धतीनें करीत असत. युरोपियन संस्कृति व युरोपियन सत्ता यांच्या पकडींतून निसटण्यासाठीं हे देशहि झगडत असल्यामुळें, भारतीय देशभक्तांचा झगडा व या देशांतल्या लोकांचा झगडा यांचें उद्दिष्ट एका अर्थी समानच आहे असें मानून, पंडितजी या इस्लामी देशांतल्या चळवळींचा पाठपुरावा करीत असत. बकर-ईदच्या प्रसंगीं दिल्लीच्या मुसलमानांनीं गोवध करूं नये असें अफगाणिस्थानच्या अमिरानें या सुमारास जाहीर केलें होतें. मुसलमानांनीं हिंदूंच्या धर्मभावनांचा अशा प्रकारें आदर केला तर मुसलमानी जग व हिंदू जग यांच्यामध्यें एक अभि-

नव ऐक्यभावना निर्माण होईल हें ओळखून, पंडितजींनीं अमिराच्या या घोषणेचें प्रकटपणें अभिनंदन केलें.

मुझफरपूरला खुदिराम बसूनें बॉम्बगोळा शिलगाविला व तेथून हिंदी राजकारणाला एक नवी गति मिळाली. अलीपूर कटाचा खटला म्हणून त्या काळीं गाजलेला खटला सुरू झाला व बंगालमधील साहसी तरुणांनीं सशस्त्र क्रांतिकारक संघटना कशी निर्माण केली होती हें जगाला कळलें. या संघटनेचे धागेदोरे कितीतरी दूरवर पसरलेले आहेत हें ओळखणाऱ्या सरकारनें वृत्तपत्रांची मुस्कटदाबी पद्धतशीरपणें चालविली व लोकमान्य टिळकासारख्या सर्वमान्य पुढाऱ्याला सहा वर्षें हद्दपार करण्याचा हटवादीपणाहि सरकारनें केला. लंडनमध्यें असलेले सावरकरप्रभृति हिंदी तरुण दिवसेंदिवस अधिकाधिक साहसी, संघटित व निश्चयी बनत चालले होते. या तरुणांनीं १९०८ सालीं इंडिया हाऊसमध्यें १८५७ सालच्या स्वातंत्र्यसंग्रामातल्या हुतात्म्यांचा स्मृतिदिन साजरा केला. या प्रसंगीं 'हुतात्म्यांनो' या शीर्षकाचें जें इंग्रजी पत्रक छापून प्रसृत करण्यात आलें तें शामजींनीं लिहिलें आहे असा आरोप करण्यात आला. त्यामुळें शामजींना क्रांतिकारक कृत्याविषयींचें आपलें धोरण काय आहे याचा खुलासा उघडपणें करावा लागला. देशभक्तीनें प्रेरित झालेले तरुण जुलमाला तोंड देतांना अद्ययावत् शास्त्रीय ज्ञानाचा उपयोग करूं लागले तर त्यात आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं आणि युरोपातल्या विविध देशात त्या त्या देशातल्या जुलमी राजसत्तेविरुद्ध क्रांतिकार्य करणाऱ्या तरुणांचा पाठपुरावा करणाऱ्या इंग्रजांनीं तरी हिंदी क्रांतिकारकाच्या नांवानें खडे फोडूं नयेत असें शामजी वेगवेगळ्या प्रकारांनीं वेगवेगळ्या प्रसंगीं प्रतिपादूं लागले. खुदीराम बसू प्रभृति चौघा बंगाली तरुणाच्या स्मरणार्थ शामजींनीं १९०८ च्या शेवटीं शेवटीं कांहीं शिष्यवृत्त्याहि जाहीर केल्या. मरणमारणाच्या उद्योगात रंगणाऱ्या साहसी तरुणांच्या कृतींचें अशा प्रकारें कौतुक करणारे व समर्थनहि करणारे पंडितजी स्वतःचा आचारमार्ग कोणता हें मात्र ओळखून असत. इंग्रजांवर सार्वत्रिक बहिष्कार पडला व भारतीय शासनयंत्र चालविणें इंग्रजाना अशक्य झालें म्हणजे प्रत्यक्ष रक्तपाताचा प्रसंग न येताच भारताचें स्वातंत्र्य सिद्ध होईल, असें पंडितजी मानीत असत.

नुसतीच दडपशाही चालू ठेविली तर नेमस्त पुढारीहि आपल्याविरुद्ध बिथरतील हें ओळखून ब्रिटिश सरकारनें नेमस्तांचा अनुनय करण्यासाठीं १९०८ सालीं ज्या मोर्ले–मिंटो सुधारणा जाहीर केल्या त्या अगदींच भिकारड्या होत्या. शामजी त्याचा स्वीकार करतील हें शक्यच नव्हतें. सुधारणा अगदींच तुटपुंज्या नि भिकारड्या असल्यामुळें त्या हिंदी राष्ट्रांत फारसा बुद्धिभेद निर्माण करतील ही शक्यता नाहीं हें पाहून शामजींना एक प्रकारचें समाधानच वाटलें. १९०८ च्या डिसेंबर महिन्याच्या शेवटीं ' मॉर्निंग पोस्ट ' या इंग्रजी पत्रानें शामजींवर व त्यांच्या समवेत पॅरिस येथें राहणाऱ्या हिंदी क्रांतिकारकांवर उघडपणें हल्ला चढविला. पॅरिसला जाणाऱ्या प्रतिष्ठित इंग्रजांचे बॉंबच्या साहाय्यानें बळी घेण्याचे कट पॅरिसमधील हिंदी नागरिक रचीत आहेत असा दुष्ट आरोप करणाऱ्या या पत्राचा हेतु असा होता कीं, फ्रेंच सरकारनें आपल्या हद्दींतून शामजी प्रभृतींना हुसकून लावावें. या आरोपांना उत्तर देण्याच्या निमित्तानें शामजींनीं जे लेख लिहिले ते धोरणीपणाचे असले तरी, सावरकरांच्या प्रभावळींत वावरणाऱ्या अनेक क्रांतिप्रिय तरुणांना ते रुचले नाहींत. शामजींचा स्वभाव काहींसा कंजूष व संशयी असल्यामुळें त्यांच्यावर या तरुणांपैकीं अनेक जण रुष्ट झालेलेच होते. सरोजिनी नायडूंचे बंधु वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय हे अशा तरुणांपैकीं एक होते. ह्यांनीं ' लंडन टाइम्स 'मध्यें पत्रें लिहून शामजींच्या नेतेपणाचा बुडबुडा फोडण्याचा प्रयत्न केला. १९०९ च्या मार्च महिन्यात शामजींना चट्टोपाध्याय यांनीं निर्माण केलेल्या वादळाला तोंड देण्याचा प्रयत्न करावा लागला.

साहसी हिंदी तरुणांच्या हिंसाप्रधान कार्यांपासून व प्रचारापासून आपण अलिप्त आहों असें भासविण्याच्या नादांत शामजींनीं स्वतःवर या तरुणांचा रोष ओढवून घेतलाच; पण स्वतःला सांवरण्याचा त्यांचा हा प्रयत्न कोणत्याच दृष्टीनें उपयुक्त ठरला नाहीं! मृदंगाला दोहींकडून थपडा बसाव्या तशी शामजींची स्थिति झाली. ते ज्या संस्थेतर्फें बॅरिस्टर म्हणून मान्य करण्यांत आले होते त्या संस्थेच्या इंग्रज प्रमुखांना शामजींच्या मतप्रचाराचा ठसका बसूं लागला आणि १९०९ च्या मार्च महिन्याच्या शेवटीं या प्रमुखांनीं शामजींना एक पत्र लिहिलें. बॅरिस्टरच्या यादींतलें तुमचें नाव

कमी कां करूं नये असा प्रश्न पंडितजींना विचारण्यांत आला होता. या कामीं उत्तराउत्तरी करण्यांत पंडितजींचा एप्रिल महिन्यांतला वेळ गेला. पण, शेवटीं एप्रिल महिन्याच्या अखेरीस बॅरिस्टरांच्या यादींतून पंडितजींचें नांव कमी झालेंच ! पंडितजींनीं बॅरिस्टरचा धंदा यापूर्वी केव्हां केला नव्हता व पुढेंहि तो धंदा करण्याचा त्याचा मानस नव्हता. त्यामुळें बॅरिस्टरांच्या यादींतून नाव निघाल्याबद्दल पंडितजींना वाईट वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें ! उलट, चट्टोपाध्यायप्रभृति तरुणानीं निर्माण केलेल्या वादळामुळें ओहोटूं लागलेली आपली लोकप्रियता पूर्वपदावर आणून सोडण्याचे एक साधन या दृष्टीनें पंडितजींना या प्रकरणाचा थोडाफार फायदाच झाला !

१९०९ च्या जूनपासून पुढील कांहीं महिने हिंदी राजकारणाच्या दृष्टीनें फारच खळबळीचे गेले. लंडनमधील तरुण हिंदी क्रांतिकारकांचे नेते विनायकराव सावरकर यांचे ज्येष्ठ बंधु गणेशपंत यांना जूनच्या आरंभीं जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा ठोठावण्यांत आली. या गोष्टीला पुरे दोन महिने लोटले नाहींत तोच मदनलाल धिंग्रा या धीरोदात्त साहसी तरुणानें खुद्द लंडन शहरांतच सर वुइल्यम कर्झन वायली या इंग्रज अधिकाऱ्याचा बळी घेतला. धिंग्राचें हें कृत्य, अटक झाल्यावर त्यानें केलेलें धीरगंभीर वर्तन, त्याचें न्यायालयांतले खणखणीत जबाब, त्याला सांगण्यांत आलेली शिक्षा व शेवटीं १७ ऑगस्ट १९०९ रोजीं त्याला सांगण्यात आलेल्या देहांत शिक्षेची अंमलबजावणी या सर्व गोष्टी इतक्या द्रुत गतीनें घडत गेल्या कीं, या दोन तीन महिन्यांच्या अवधींत सार्वजनिक चर्चेला याखेरीज अन्य विषयच सापडूं शकला नाहीं. क्रांतिकारक चळवळीला उधान भरती येत असल्याचें पाहून स्वतःला सावरून धरण्याचा पंडितजींनीं पुष्कळ प्रयत्न चालविला होता; पण फ्रान्समध्यें सुरक्षितपणें राहिलेले शामजीच या सर्व कृत्यांचा पाठपुरावा करीत आहेत अशी ब्रिटिश सरकारची व ब्रिटिश वृत्तपत्रांची ठाम समजूत झालेली होती. फ्रान्सच्या राज्यसंस्थेनें शामजी कृष्णवर्मांना हुसकून लावावें व ब्रिटिश सरकारनें मदनलाल धिंग्रा बरोबरच शामजींवरहि आरोपी म्हणून खटला भरावा अशा उघड सूचना या वेळीं कांहीं ब्रिटिश वृत्तपत्रांनीं केल्या होता. धिंग्रा प्रकरणांतलें शामजींचें एकंदर वर्तन पाहिलें तर त्यांच्या मनाची अवस्था ‘ धरावें तर डसतें, सोडावें तर

पळणें ' अशी द्विधा झाल्याचें स्पष्ट दिसतें. या त्यांच्या घरसोडीबद्दल त्यांना लंडन येथील इंडिया हाऊसमधील तरुणांनीं पत्रद्वारा पुष्कळच छेडलें. बरेच दिवस अशा भवति न भवतीमध्यें गेल्यावर मात्र शामजींनीं उघडपणें धिंग्राजींच्या कृत्याबद्दल प्रशंसोद्गार काढले. धिंग्राजींना त्यांनीं हुतात्मा म्हणून गौरविलें आणि खुदिराम बसूप्रभृति बंगाली तरुणांच्या नांवें त्यानीं जशा चार शिष्यवृत्या दिल्या होत्या तद्वतच धिंग्राजींच्याहि नांवें चार शिष्यवृत्या देण्याचा आपला मानस त्यांनीं जाहीर केला.

पंडितजींवरील ब्रिटिश सरकारचा रोष यामुळें जास्तच वाढला ! फ्रेंच सरकारला भर देऊन पंडितजींना फ्रान्समधून हुसकून लावणें ब्रिटिश सरकारला देखील सहज साधण्यासारखें नव्हतें; म्हणून पंडितजींच्या मासिकाच्या मागे हात धुवून लागण्याचें त्यांनीं ठरविलें. आर्थर बोस्लें व गाय आल्ड्रेड या दोन मुद्रकावर एकामागोमाग ब्रिटिश सरकारनें खटले भरले व या दोघांना अनुक्रमें चार महिने व एक वर्ष कारावासाची शिक्षा करण्यांत आली. ब्रिटिश सरकार इतकें खवळलें होतें व इंग्लंडमध्यें प्रवेश करणें पंडितजींना शक्य नव्हतें तरी, त्यानीं इंडियाहाऊस बंद झाल्यावर त्याची प्रशस्त इमारत किफायतशीर रीतीनें विकून टाकिली व त्या कामीं खर्च झालेली पै नि पै त्यानीं वसूल करून घेतली ! 'इंडिया हाऊस' सारखी एकादी संस्था चालविण्याचा प्रयत्न पंडितजींनीं फिरून केलाच नाहीं; मात्र, 'इंडियन सोशिऑलॉजिस्ट' हें मासिक त्यानीं पॅरिस येथें छापून घेण्याला प्रारंभ केला.

शामजींचे कित्येक स्वभावविशेष आणि हिंदी क्रांतिकारक पक्षाविषयींची त्यांची घरसोडीची वृत्ति यांचा परिणाम असा झाला कीं, राणा, मादाम कामा, चट्टोपाध्याय, हरदयाळ प्रभृति मंडळी दिवसेंदिवस त्यांचें नेतृत्व मानण्याला नाराज होऊं लागली. काहीं तरुण मंडळी पंडितजींचा उघड उघड अधिक्षेप करीत; इतर काहीं असें करण्याचें टाळीत ! पण, एकंदरींत क्रांतिकारक पक्षात शामजींना मानाचें स्थान उरलें नाहीं हें निश्चित ! १९०९ च्या नोव्हेंबर महिन्यांत लाला हरदयाळ यांच्या संपादकत्वाखालीं ' वंदे मातरम् ' हें मासिक सुरू झालें, तें शामजींपासून आपण भिन्न आहों असें स्पष्टपणें म्हणणाऱ्या हिंदी क्रांतिकारकांचें मतपत्र म्हणूनच निघालें ! शामजींचें ' इंडियन सोशिऑलॉजिस्ट व ' वंदे मातरम् ' आणि त्याच्या मागून निघालेलीं ' तल

दार ' प्रभृति पत्रें यांनीं संयम राखिला व आपसांतल्या मतभेदांचें जगाच्या वावडीवर प्रदर्शन मात्र होऊं दिलें नाहीं.

२१ डिसेंबर १९०९ रोजीं अनंत लक्ष्मण कान्हेरे या साहसी तरुणानें नाशिकचा कलेक्टर मि. जॅक्सन याचा नाशिक येथील एका नाट्यगृहांत बळी घेतला त्याबरोबर हिंदी राजकीय वातावरण फिरून प्रक्षुब्ध झालें. गणेशपंत सावरकर यांना शिक्षा झाल्यावर त्याच्या कुटुंबांतल्या मंडळींना आर्थिक मदत करण्याला प्रवृत्त होणाऱ्या आणि गणेशपंत सावरकर व हेमचंद्र दास यांची अंदमानात रवानगी झाल्यावर त्याच्या नावानें शिष्यवृत्ति जाहीर करणाऱ्या शामजींनीं कान्हेरे यांच्या स्मरणार्थ कांहीं केले नाहीं ही गोष्ट त्यांच्या वृत्तींत अलीकडे पडत चाललेल्या बदलाचीहि निदर्शक असूं शकेल ! पंडित जॅक्सन-बद्दल पंडित शामजींना ममत्व वाटत असल्यामुळें, कान्हेरे यांचें कौतुक करणें त्याना पसंत पडलें नसेल, हेंहि शक्य आहे. ब्रिटिश राज्यकर्त्यांची कृपा टिकावी म्हणून हिंदी संस्थानिक या सुमारास क्रांतिकारक चळवळीवर व क्रांतिकारकांवर आग पाखडूं लागले; त्यामुळें, सावरकरप्रभृति तरुण क्रांतिकारकांनीं 'Choose, oh, Indian Princes' हें खणखणीत पत्रक प्रसिद्ध केलें. त्याप्रमाणेंच पंडितजींनींहि हिंदी संस्थानिकांना आपल्या मासिकाच्या द्वारा इषारा दिला.

'The Indian War of Independence of 1857' हा सावरकरांचा विख्यात ग्रंथ प्रसिद्ध झाल्यावर सहा महिने पावेतों शामजींनीं आपल्या मासिकात त्याचा निर्देश केला नाहीं व इतका उशीर झाल्यावर त्यानीं या ग्रंथाचें परीक्षण केलें तेंहि स्वतः लेख लिहून केलें नाहीं ही गोष्ट शामजींची या सुमाराची मनोरचनाच दिग्दर्शित करीत आहे. स्वकीय मित्रमंडळींच्या मनांतून उतरत चाललेले शामजी अखंडितपणें नवे नवे परकीय मित्र मिळवीत होते, त्यांचें लिखाण आपल्या मासिकांतून प्रसिद्ध करीत होते आणि तुर्कस्थान, ईजिप्त वगैरे देशांतल्या राजकीय उठावाचें विवरण ते आपल्या मासिकाच्या द्वारा मोठ्या चतुराईनें करीत होते. ईजिप्तचे पंतप्रधान बोटॅस पाशा यांचा वार्डनी नांवाच्या तरुणानें १९१० च्या सुरुवातीला पिस्तुल झाडून बळी घेतला. या घटनेचें पंडितजींना आपल्या मासिकातून सूक्ष्म व मूलग्राही सम-

र्थन करतां आलें त्याचें कारण पंडितजींनीं अश्रांतपणें परकीयाशीं जोडलेले वैचारिक संबंध हें होय.

धिंग्रा-प्रकरणाचें नैसर्गिक पर्यवसान म्हणून 'इंडिया हाऊस' ही संस्था कायमची बंद करण्यांत आल्यावर कांहीं दिवसांनीं विनायकराव सावरकर प्रकृतिस्वास्थ्यासाठीं म्हणून पॅरिसला जाऊन राहिले होते. जॅक्सन कलेक्टरचा खून होताच खडबडून जागृत झालेल्या पोलिस खात्यानें नाशिक कटाचा खटला उभारण्याची जय्यत तयारी चालविली. या कटाचा अखेरचा उगम लंडन येथें राहणारी सावरकर ही व्यक्तीच होय अशी खात्री पटल्यामुळें, मुंबईच्या पोलिस खात्यांतले कांहीं अधिकारी सावरकरांना लंडन येथें अटक करण्यासाठीं व त्याना तेथून मुंबईस आणण्यासाठीं रवाना झाले. अशा परिस्थितींत सावरकरांनीं पॅरिस सोडून लंडनला जाऊं नये असें शामजींचें मत होतें व तें सावरकरांच्या मनावर बिंबविण्याचा त्यानीं पराकाष्ठेचा प्रयत्न केला. सावरकर लंडनला पोंचतांच पकडले गेल्यापासून त्यांची हिंदुस्थानकडे रवानगी होईपर्यंतच्या काळांत, ब्रिटिश न्यायालयांत सावरकरांच्या वतीनें ज्या खटपटी करण्यांत आल्या त्या सर्वांचा पाठपुरावा शामजी पॅरिसहून करीत होते. बोट हिंदुस्थानकडे जात असताना वाटेंत संधि मिळाली तर सावरकर बोटींतून व ब्रिटिशांच्या कैदेंतून निसटण्याचा प्रयत्न करतील हें जाणणारे श्री. व्ही. व्ही. एस्. अय्यर लंडनहून पॅरिसला आल्यावर, निसटूं पाहणाऱ्या सावरकरांना मदत करण्याबद्दल जीं खलबतें झालीं, तीं शामजींना विदित होतीं. बोटींतून निसटूं पाहणारे सावरकर मार्सेलिस बंदरांत धक्यावर उतरले होते व फ्रेंच पोलिसांनीं अप्रत्यक्षपणें मदत केल्यामुळें ब्रिटिश पोलिसांना सावरकरांना फिरून अटक करण्याच्या कामीं यश मिळालें ही माहिती मिळतांच, आंतरराष्ट्रीय कायद्याचे अनेक प्रश्न उपस्थित करून फ्रेंच समाजवादी पक्षामार्फत ब्रिटिश सरकारला सतावून सोडण्याच्या उद्योगांत शामजींच्या अंगीं असलेली बुद्धिमत्ता, चिकाटी वगैरे गुण उत्तम प्रकारें सिद्ध झाले. शामजी व त्याचे सहकारी यांनीं हें प्रकरण एकसारखें जगापुढें घुमसत ठेवलें नसतें तर, सावरकर–प्रकरण हेगच्या न्यायालयापुढें जातें कीं नाहीं याबद्दल शंकाच वाटते ! हेग येथील न्यायालयानें दिलेला निर्णय ब्रिटनला अनुकूल ठरला व दोन जन्मठेपींची असामान्य शिक्षा भोगण्याला सावरकर अंदमानांत

गेले. या घटनेमुळें सावरकरांच्या इतर सहकाऱ्यांप्रमाणेंच शामजींचें मनहि निराशाग्रस्त झालें. भ्रातृभाव, मानव्य वगैरे बड्याबड्या तत्त्वांचा जयघोष करणारें फ्रेंच सरकारहि या सर्व प्रकरणांत केवळ जुलुमाचा रामराम म्हणून कांहींतरी केल्याचा बहाणा करीत आहे हें स्पष्ट झाल्यामुळें तर, शामजींच्या मनाला कांहीं काळपर्यंत कमालीच्या निराशेनें घेरलें!

स्वकीयांनींच शामजींविषयीं लोकमत कलुषित करण्याचे जे प्रयत्न अनेकवार केले, तेहि या सुमारास पराकोटीला पोंचले होते. मदनलालजी धिंग्रा शामजींचा कमालीचा तिरस्कार करीत असत असें एक विधान जाहीर रीत्या करण्यांत आलें तर मुंबईहून कोणा तरी उपद्व्यापी व्यक्तींनीं एक पत्र लिहून शामजींना जींवें मारण्याची धमकी दिली. पायोनियर या ॲंग्लो-इंडियन पत्रात अशाच कांहीं विघ्नसंतोषी व्यक्तींनीं पत्र लिहिलें व शामजींची स्वतःची नबाबी राहणी व त्यांनीं सुरू ठेवलेला स्वार्थत्यागाचा पुरस्कार यामधील विसंगति लोकांच्या निदर्शनास आणून देण्याचा प्रयत्न केला. ॲनी बेझंट बाईनीं या सुमारास पंडितजींवर हल्ला चढविला; त्याला उत्तर देताना शामजींनीं वयपरत्वें आपलें सामर्थ्य कमी होत चाललें असल्याची कबुली दिली; पण, ज्या ' पोराना ' शामजींनीं सुळावर चढविल्याबद्दल बाईनीं दूषण दिलें होतें त्या तरुणाबद्दल खंबीर अभिमानानें लिहिण्याला पंडितजी चुकले नाहींत. देशसेवा व आत्मसमर्पण यांची ज्वलंत तळमळ उपजतच बरोबर घेऊन हे तरुण भूतलावर अवतरले होते, असें पंडितजींनीं लिहिलें. या सर्व उद्वेगकारी घटना भोंवतीं घडत असतांनाच शामजींनीं पूर्वीं जाहीर केलेला एक संकल्प कृतीनें पुरा करून टाकला. ईजिप्तचा क्रांतिकारक हुतात्मा वॉर्डेनी याच्या गौरवासाठीं शामजींनीं एक बक्षिस जाहीर केलें होतें. ' ईजिप्तच्या स्वातंत्र्यसिद्धीचे उत्तम उपाय ' या विषयावर लिहिलेल्या सर्वोत्तम प्रबंधाला हें बक्षिस मिळावयाचें होतें. पॅरिस विद्यापीठाच्या एका पदवीधर पंडितेला हें बक्षिस देऊन शामजींनीं वचनपूर्तीचें समाधान मिळविलें.

इंग्लंडचे त्या वेळचे राजे पांचवे जार्ज यांनीं आपल्या गद्देपंचविशींत माल्टा येथील वास्तव्यांत एका नाविक अधिकाऱ्याच्या पोरीशीं चोरटें लग्न केलें होतें, अशा आशयाचा मजकूर 'लिबरेटर' नांवाच्या पत्रांत या सुमारास प्रसिद्ध झाला. हा मजकूर लिहिणारा मिलियस नांवाचा एक माणूस होता. शामजींचा व

त्याचा पत्रव्यवहार चालू असे असें, पुढें सिद्ध झालें. लिबरेटर पत्राचे प्रकाशक जेम्स हे तर शामजींचे स्नेही म्हणून प्रसिद्धच होते. राजाविरुद्ध मजकूर लिहिणारा व तो प्रसिद्ध करणारा अशा दोघांशींहि शामजींचा संबंध पोंचत आहे असें दिसताच कसलेंहि निमित्त सांपडतांच शामजींविरुद्ध गरळ ओकणाऱ्या ब्रिटिश वृत्तपत्रांनीं एकच कोल्हेकुई सुरू केली. कित्येक जबाबदार फ्रेंच वृत्तपत्रेंहि या अपप्रचाराला दुजोरा देत आहेत असें दिसताच शामजींनीं आपलें मौन सोडलें. या भानगडीशीं आपला अर्थाअर्थी काडीचाहि संबंध नाहीं असें जाहीर करून, आंग झटकून शामजी मोकळे झाले.

आज ना उद्यां जर्मनीशीं आपल्याला दोन हात करावे लागणार हें ओळखून इंग्लंडनें दूरदर्शीपणानें प्रबळ राष्ट्रांशीं मित्रत्वाचे तह करण्याच्या वाटाघाटी सुरू केल्या होत्या. कोट्यवधि लोकांना आपल्या दास्यांत जखडून ठेवणाऱ्या इंग्लंडशीं अमेरिकेनें स्नेहसंबंध जोडणें म्हणजे आपल्या पूर्वजांनीं निर्माण केलेली उज्ज्वल परंपरा विसरणें होय, अशा आशयाचें अनावृत पत्र अमेरिकेच्या अध्यक्षाना लिहून शामजींनीं फिरून एकवार स्वातंत्र्यवादी देशभक्ताकडून धन्यवाद मिळविले. या सुमारासच शामजींनीं भारतातल्या स्वातंत्र्य चळवळीविषयींचें विस्तृत विवेचन करणारा एक लेख लिहिला. त्या लेखाचें जर्मन भाषांतर होऊन तो एका नामवंत जर्मन मासिकांत प्रसिद्ध झाला. हिंदी क्रांतिकारक पक्ष व जर्मनी याचे संबंध यापुढील काळांत जे दृढावत गेले, त्या संबंधांची मुहूर्तमेढ शामजींच्या या लेखामुळें रोवण्यांत आली असें म्हणावयाला हरकत नाहीं.

जॉर्ज बादशहांच्या राज्यारोहणाचा दरबार १९११ च्या शेवटीं दिल्लीस भरला व बंगालची फाळणी रद्द झाल्याची घोषणा करण्यात आली. दरबारच्या निमित्तानें जाहीर झालेल्या बाकीच्या गोष्टी क्षुद्र ठरवून शामजींनी फाळणी रद्द करावी लागली हा भारतांतल्या वाढत्या असंतोषाचा परिणाम होय, असें स्पष्ट म्हटलें. भारतांतला असंतोष नष्ट झाला असें गर्जून सांगणाऱ्या ब्रिटिश वृत्तपत्रांना शामजींनीं बजावलें : हा असंतोष तूर्त अदृश्य झाला असला तरी जिवंत आहे व तो उचित काळाची फक्त मार्गप्रतीक्षा करीत आहे. शामजींनीं दिल्ली दरबारच्या परिणामाविषयीं व भारतीय असंतोषाविषयीं अशीं मतें व्यक्त केलीं, त्याच सुमारास युरोपांतल्या अनेक

वृत्तपत्रांनीं एक भडक वृत्त प्रसिद्ध करून टाकलें. हिंदुस्थानांत गेलेले बादशहा मारले गेले, अशा आशयाची क्षोभजनक वार्ता प्रसार पावल्याबरोबर, शामजींचे शत्रु फिरून त्यांच्याकडे टवकारून बघूं लागले. पण. ही वार्ताच सपशेल खोटी ठरल्यामुळें, हें वादळहि लौकरच शान्त झालें. दिल्लीदरबारच्या वेळीं संस्थानिकांनीं बादशहापुढें कसें वागावें याविषयींच्या तपशीलवार सूचना देण्याची दक्षता पोलिटिकल डिपार्टमेंटनें घेतली होती. तरीहि बडोद्याचे सयाजीराव महाराज गायकवाड हे या सूचनाप्रमाणें वागले नाहींत. यामुळें ब्रिटिश वृत्तपत्रांनीं महाराजांवर आग पाखडण्याला सुरुवात केली. बडोदा नरेशाचे क्रांतिकारकांशीं असलेले लागेबांधे, खुद्द बडोदें शहरांत रुजलेली नि वाढलेली क्रांतिकारक चळवळ या सर्वांची उद्धारगत करण्याची आपली हौस भागवून घेता घेता ब्रिटिश वृत्तपत्रांनीं या निमित्तानेंहि शामजींना पोटभर शिव्या हासडून घेतल्या.

स्वातंत्र्य व लोकशाही यांच्या पुरस्कारासाठीं जगांत कोठेंहि कांहीं विशेष घडलें तर त्याकडे आत्मीयतेनें पाहणाऱ्या शामजींनीं चीनमध्यें डॉ. सन् यत्-सेन यांच्या नेतृत्वाखालीं जी लोक-क्रांतीची उठावणी झाली तिचें मनोभावानें स्वागत केलें. १९१२ च्या मध्याच्या सुमारास इंग्लंड, स्वित्झर्लंड, इटली वगैरे अनेक देशांत सावरकरांची अंदमानांतून मुक्तता व्हावी यासाठीं चळवळ झाली. शामजींना. या चळवळींचा पुरस्कार करण्यांत धन्यता वाटली. थोर रशियन ग्रंथकार मॅक्झिम गोर्की याच्याशीं शामजींचा या सुमारास पत्रव्यवहार सुरू होता. भारतासारख्या थोर देशाच्या स्वातंत्र्यार्थ अहर्निश झटपटी करणारे म्हणून शामजींबद्दल गोर्कींना फार आदर वाटत असल्याचें या वेळच्या पत्रव्यवहारावरून दिसतें.

१९१२ च्या डिसेंबरांत व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज यांच्या दिल्लीप्रवेशाच्या वेळीं जो बॉम्बस्फोट झाला त्यासंबंधींचीं शामजींचीं मतें 'सन्' या अमेरिकन वृत्तपत्रात प्रसिद्ध झालीं. घडलेल्या प्रकाराशीं माझा कांहीं संबंध नसला तरी त्यामुळें मला आश्चर्य मात्र वाटलें नाहीं अशी प्रस्तावना केल्यावर शामजी म्हणाले : हत्या ही क्रांतीची पुरस्सर अशी गोष्ट आहे आणि क्रांति अवश्य असल्यामुळें हत्याहि अटळ आहे. युक्तिवादामागें बळ नसेल तर

युक्तिवादाकडे कोणीहि लक्ष देत नाहीं. दरोडेखोराशीं सामना करावयाचा तर त्याला जमीनदोस्तच केला पाहिजे; त्याच्याशीं युक्तिवाद करून चालणार नाहीं: स्वातंत्र्यसंग्रामात गढून गेलेल्या व्यक्तींच्या धैर्यानें कोणतेंहि रूप धारण केलें तरी तें समर्थनीयच होय.

पुढें जर्मनीचें इंग्लंडशीं युद्ध सुरू झाल्यावर ज्या हिंदी क्रांतिकारकांनीं जर्मनींत राहून महत्त्वाच्या खटपटी नि उलाढाली केल्या त्यांच्यापैकीं श्री. चंपकरमण पिले हे या सुमारास जर्मनीमधील कामाची पूर्वसिद्धता करून फ्रान्समार्गें अमेरिकेकडे रवाना झाले. पॅरिस येथें शामजी व पिले यांच्या गांठीभेटी झाल्यावर शामजींनीं पिले यांना अनेक महत्त्वाच्या सूचना केल्या व इतरहि अनेक प्रकारानीं त्यानीं पिले यांना मदत केली. अनेक वर्षे पॅरिसमध्यें राहून ईजिप्त, माल्टा, जावा, चीन, सयाम, आयर्लंड, तुर्कस्थान, रशिया, अमेरिका वगैरे देशांशीं संधानें जोडून व तेथील स्वातंत्र्य चळवळींचे धागेदोरे उकलून सागून भारतातल्या स्वातंत्र्य चळवळींचें स्वरूप विशाल बनविण्याचा प्रयत्न करणाऱ्या शामजींना १९१४च्या जून महिन्यात पॅरिसला रामराम ठोकून जिनीव्हा येथें जाऊन रहावें लागलें. जर्मनीशीं होणाऱ्या संग्रामाची सिद्धता म्हणून इंग्लंडनें फ्रान्सपाशींहि स्नेहसंबंध जोडले होते व या स्नेहभावाचें जगापुढें प्रदर्शन व्हावें म्हणून इंग्लंडचे राजे पंचम जॉर्ज यांनीं मोठ्या थाटामाटानें १९१४ च्या एप्रिलमध्यें पॅरिसला भेट दिली. जॉर्ज राजे पॅरिसमध्यें होते त्या अवधींत शामजी धोरणीपणानें पॅरिसबाहेर निघून गेले होते. त्यांच्या गैरहजिरींत पॅरिसच्या पोलिस प्रमुखानें त्यांना दोनदां निकडीचीं निमंत्रणें धाडलीं. प्रत्यक्ष युद्ध सुरू झाल्यावर फ्रान्समध्यें आपला कसा छळ केला जाईल याची कल्पना शामजींना या प्रकारावरून करता आली व म्हणून त्यानीं युद्धाची प्रत्यक्ष सुरवात होण्याआधींच फ्रान्समधून आपलें वास्तव्य हलविलें. या स्थलांतरानंतर शामजींच्या मासिकाचे जे एकदोन अंक प्रसिद्ध झाले त्यांपैकीं एकांत टिळकांच्या मुक्ततेबद्दल समाधान व्यक्त करण्यांत आलें आहे. युद्धकाळांतहि आपलें मासिक चालू ठेवण्याचा शामजींचा इरादा होता; पण, युद्ध सुरू होतांच स्वित्झर्लंडच्या सरकारी अधिकाऱ्यांनीं गळ घातल्यामुळें नाइलाज होऊन शामजींनीं आपलें मासिक शेवटीं बंद ठेवलें. युद्ध संपल्यावर

शामजींनीं मासिकाचें पुनरुज्जीवन केलें; पण, त्यांत पूर्वीचा जोम नव्हता. अल्पकाळ चालून तें बंद पडलें.

चंपकरमण पिले, वीरेंद्र चट्टोपाध्याय, तारकनाथ दास, बरकतुल्ला इत्यादि हिंदी क्रांतिकारकानीं बर्लिनमध्यें बसून युद्धकाळात भारतीय स्वातंत्र्य प्रस्थापित करण्यासाठीं काय काय खटपटी करावयाच्या याविषयींचे नकाशे तयार केले होते. अमेरिकेंत लाला हरदयाळ यानींहि यासंबंधींच्या योजना आखून तयारी केली होती. खुद्द हिंदुस्थानांत राशबिहारी बोस यानीं पंजाब, युक्तप्रांत, बंगाल इत्यादि भागात क्रांतिकारक संघटनेची सुंदर गुंफण केली होती. शामजींना या उद्योगांची तपशीलवार माहिती होती. लाला हरदयाळ अमेरिकेंतून निसटले व फ्रान्समधून स्वित्झर्लंडच्या मार्गें जर्मनींत घुसले त्या वेळीं शामजींनीं त्याना मदतीचें आश्वासनहि दिलें होतें. पुढेंहि कित्येक दिवस हरदयाळ त्यांना पत्रें धाडीत व त्यामुळें काय घटना घडत आहेत याची बरीचशी अचूक कल्पना शामजींना करता येई; पण, शामजींनीं स्वित्झर्लंडच्या सरकारला राजकारणी उलाढाली नि चळवळी न करण्याचें आश्वासन दिलें असल्यामुळें, माहितीचा संग्रह जवळ बाळगण्याहून जास्त काही करणें त्यांना युद्धकाळात साधलें नाहीं.

अशा निरुपद्रवी पद्धतीनें काळ कंठणाऱ्या शामजींच्या भोंवतींहि आपल्या हेरांचा पहारा ठेवण्याला ब्रिटिश सरकार चुकलें नाहीं. जिनीव्हा येथें त्या काळांत डॉ. ब्रीस या नांवाचे एक उलाढाल्ये गृहस्थ होते. भारताच्या स्वातंत्र्यविषयक आकांक्षाचे आपण चहाते आहों असें भासवीत-भासवीत या गृहस्थांनीं शामजींवर छाप बसाविली आणि शामजींकडे त्यांचें प्रस्थ खूपच वाढलें. १९१८ मध्यें या गृहस्थांना मारण्याचा प्रयत्न झाला व तो फसल्यावर जो खटला चालला त्यांत या गृहस्थांनीं स्वतःच आपल्या सत्य स्वरूपाचें—म्हणजे आपण ब्रिटिश हेर असल्याचें—आविष्करण केलें.

वारंवार येत गेलेले असले कटु अनुभव, युद्धाच्या पर्वकाळांत स्वतःवर हात जोडून स्वस्थ बसण्याचा प्रसंग आल्यामुळें वाटणारें दुःख आणि शेवटीं युद्धांत जर्मनीचा पराभव झाल्यामुळें उत्पन्न झालेला आशाभंग अशा अनेक कारणांनीं उद्विग्न नि निराश झालेल्या शामजींना अमेरिकेचे त्या वेळचे अध्यक्ष विल्सन हे कांहीं दिवस भारताचें आशास्थान म्हणन आदरणीय

वाटूं लागलें होते. प्रेसिडेंट विल्सन व राष्ट्रसंघ यांचें लक्ष भारताकडे वेधावें म्हणून शामजींनीं १९१९ च्या आरंभीं विल्सन साहेबांना एक पत्र धाडलें व प्रेसिडेंट विल्सन लेक्चरशिपची आपली योजना मान्य झाल्यास आपण खूप मोठी रक्कम खर्च करण्यास तयार आहों असें कळविलें. पण, शामजींनीं या दिशेनें केलेले सर्व प्रयत्न निष्फळ ठरले !

लोकमान्य टिळकांच्या मृत्यूनंतर शामजींनीं त्याचें स्मारक इंग्लंडमध्यें व्हावे यासाठीं खटपट केली. टिळक स्मारकासाठीं दहा हजार रुपयाची रक्कम खर्च करण्याचा संकल्प सोडून शामजींनीं लंडन येथील 'इंडिया' पत्रातून आपली योजना जगापुढें मांडली. टिळकाच्या जीवनकार्यासंबंधींचे विवेचन व्याख्यान-द्वारा प्रतिवर्षी कोणी करावयाचें हें ठरविण्याचा अधिकार पहिलीं तीन वर्षे असहकाराचे जनक गांधीजी यांच्या हातीं असावा व तदनंतर तो इंडियन नॅशनल काँग्रेसच्या अध्यक्षांच्या हातीं असावा अशी शामजींची योजना होती. गांधीजी व शामजी याच्यामध्यें जे मतभेदाचें अंतर होतें तें विसरण्याची तयारी शामजींनीं दाखविली हें खरें; पण तें विसरण्याची गांधीजींची तयारी नसल्यामुळें, आणि असला प्रचार गांधीजींना मानवण्यासारखा नसल्यामुळें, शामजींची हीहि योजना फेंटाळण्यांत आली !

१९२२ सालीं ने. ना. श्रीनिवास शास्त्री व कच्छ संस्थानचे अधिपति यांची राष्ट्रसंघावर भारतीय प्रतिनिधि म्हणून योजना झाली. परतंत्र भारताचे हे प्रतिनिधि म्हणजे ब्रिटिश राज्यकर्त्यांचें तोंडीं लावणें होय अशा आशयाची टिका करतांना शामजींनीं आपल्या मासिकांत जे विचार व्यक्त केले ते पाहिले तर असें स्पष्ट दिसतें कीं, निराशा व वार्धक्य यानीं जर्जर झालेल्या या पंडिताच्या मनांतली स्वदेशाच्या निर्भेळ स्वातंत्र्याबद्दलची तळमळ लोप पावलेली नव्हती. ही टीका केल्यावर थोड्याच महिन्यांनीं शामजींनीं १९२३ मध्यें आपलें इंडियन सोशिऑलॉजिस्ट मासिक कायमचें बंद करून टाकलें.

बर्लिन येथें राहून भारतीय स्वातंत्र्यासाठीं प्रचार करण्याचा व इतर खटपटी करण्याचा प्रयत्न श्री. चंपकरमण पिले यांनीं १९२३ सालीं फिरून सुरू केला. खुद्द जर्मनींतल्या लोकानींच या प्रयत्नांना पुरेसा पाठिंबा न दिल्यामुळें ते अपेशी व अल्पायुषी ठरले हें खरें असलें तरी, श्री. पिले यांनीं काढलेल्या 'Indian Independence' पत्राला शामजींचा आशीर्वाद

मिळाला होता व शामजींची मदत झाली होती हें विसरून चालणार नाहीं. पुढें रशियांत क्रांति झाल्यावर नेहरू–पितापुत्र, श्रीनिवास आयंगार प्रभृति मंडळी युरोपांत जाऊन या क्रांतीचें दर्शन घेऊन आली. याच सुमारास ब्रूसेल्स येथें सगळया पराक्रांत राष्ट्रांची परिषद झाली. या परिषदेंत ठरलेल्या योजनेनुसार वीरेंद्र चट्टोपाध्याय हे फिरून काम करूं लागतांच त्यांनीं शामजी-शीं पत्रव्यवहार सुरू केला. हा पत्रव्यवहार पुढेंहि कांहीं काळ चालू राहिला होता. बनारसचे बाबू शिवप्रसाद गुप्त हे शामजींच्या आयुष्याच्या अखेरच्या काळांत युरोपांत गेले होते. जर्मनींत फ्रँकफोर्ट येथें झालेल्या एका परिषदेंत हिंदी प्रतिनिधि म्हणून त्यांनीं भाग घेतला होता. युरोपांत आल्याबरोबर व युरोप सोडतांना अशा दोन वेळीं त्यांनीं शामजींची भेट घेतली होती.

वार्धक्यामुळें आलेला क्षीणपणा, दृष्टि अधु झाल्यामुळें वाटणारा पराव-लंबीपणा, पत्नीचें आजारीपण व शस्त्रक्रियेंतून ती कशी निभावते याविषयीं वाटणारी चिंता इत्यादि अनेक शारीरिक व मानसिक कारणांमुळें शामजी शेवटींशेवटीं विशेषसा कांहीं उद्योग करूं शकत नसत. कोठेंहि असले तरी तेथल्या शेअर बाजाराकडे त्यांचें लक्ष असे व प्रकृति ठीक असेतोंपर्यंत शेअर बाजारांतला फेरफटका त्यांनीं सोडला नाहीं. शेअर बाजारांतल्या उला-ढालींचें डोळसपणानें केलेलें परीक्षण व राजकीय परिस्थितीचें सूक्ष्म ज्ञान यामुळें शामजींना आर्थिक उलाढाली यशस्वीपणानें व किफायतशीरपणानें करतां आल्या. या यशस्वी नादामुळें शामजींचें आर्थिक स्थैर्य टिकलें व शेवटपर्यंत त्यांना अनेक उपयुक्त संकल्पांसाठीं मनाजोगा पैका खर्च करतां आला. ‘कवडी कवडी माया जोडी’ ही म्हण शब्दशः नि अक्षरशः आचरणांत उतरविणारा हा पंडित जसा साहसी तरुणाचें कौतुक करताना सढळ हातानें खर्च करी तसाच तो भोंवतालच्या लेंकराचें कौतुक करतांनाहि सढळपणानें पैसा खर्च करी.

आपण शतायु व्हावें असें शामजींना फारफार वाटत असे. त्यामुळें शरीर विकल होऊं लागल्याची जाणीव होतांच त्यांनीं खाण्यापिण्याच्या बाबतींत काटेकोर नियमांची अंमलबजावणी सुरू केली. पण, १९३० च्या आरंभीं त्यांची प्रकृति ढासळूं लागली. त्यांना मधून मधून आंतड्यांच्या कांहीं विकाराचा त्रास होत असे. तो विकार या सुमारास बळावला. त्यांना

रुग्णालयांत नेण्यांत आलें व त्यांच्यावर शस्त्रक्रिया करण्यांत आली. या आजारांतून शामजी उठतील असें एकदां वाटूं लागलें होतें; पण ती आशा फोल ठरली; आणि, ३१-३-१९३० ला शामजी रुग्णालयांतच मरण पावले. शामजींना कांहीं मूलबाळ नव्हतें. त्यांच्या पत्नी भानुमतीबाई ह्या २२ आगस्ट रोजीं जिनीव्हा येथें मरण पावल्या. त्यांनीं आपल्या पतीच्या मालमत्तेची व्यवस्था ज्या पद्धतीनें लाविली ती पद्धत पाहिली म्हणजे या बाई आपल्या पतीच्या जीवनक्रमाशीं व ध्येयांशीं किती तद्रूप झाल्या होत्या हें सहज समजतें. स्वित्झर्लंडमध्यें चालू असलेले दहा हजार फ्रँक्स त्यांनीं जिनीव्हा विद्यापीठाच्या स्वाधीन केले. कोणत्या तरी समाजशास्त्रविषयक प्रबंधाची निर्मिति व प्रसिद्धी यासाठीं या रकमेचें व्याज खर्च व्हावें अशी भानुमतीबाईंनीं योजना केली. जिनीव्हा शहरांतल्या गोरगरिबांची तेथील रुग्णालयांत सोय व्हावी यासाठीं त्यांनीं दहा हजार फ्रँक्सची देणगी दिली. पॅरिस विद्यापीठांत पौर्वात्य ज्ञानाचें अर्जन करण्यासाठीं येणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांना मदत म्हणून या बाईंनीं फार मोठी रक्कम बाजूला काढली. फ्रान्समध्यें चालणारे पाऊण लाख फ्रँक्स तरी प्रतिवर्षी व्याजाच्या रूपानें मिळतील अशा हिशेबानें बाईंनीं ही रक्कम विद्यापीठाच्या व्यवस्थापकांच्या स्वाधीन केली. या व्याजांतून योग्य अशा हिंदी विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या मिळाव्या अशी व्यवस्था बाईंनीं करून ठेविली. पॅरिसला विद्यार्जनासाठीं येणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांपैकीं दोन तरी विद्यार्थ्यांना वसतिगृहांत राहतां यावें म्हणून वसतिगृहांतल्या दोन खोल्या राखून ठेवण्यासाठीं बाईंनीं एक लक्ष फ्रँक्स विद्यापीठाला दिले. शामजींचा प्रचंड व बहुमोल ग्रंथसंग्रहहि बाईंनीं विद्यापीठाच्या स्वाधीन केला. या ग्रंथसंग्रहालयाला भेट देणाऱ्या माणसाला कृष्णवर्मा-पतिपत्नींचें स्मरण व्हावें यासाठीं त्यांचीं नांवें तेथें ठळकपणानें कोरून ठेवण्यांत आलीं आहेत.

× × ×

परराष्ट्रीय राजकारण, आंतरराष्ट्रीय राजकारण वगैरे शब्दप्रयोग सध्या फार स्वस्त झाले आहेत. भारतीय राजकारणाची प्रगति होतहोत आज अशी अवस्था आली आहे कीं, मोठमोठ्या देशांतून हिंदी वकिलाती स्थापल्या जात आहेत. अशा वकिलातींतून काम करण्याच्या योग्यतेचीं पुरेशीं माणसें आपल्यापाशीं उपलब्ध आहेत कीं काय, या प्रश्नाची शहानिशा करतांना

कित्येक थोर थोर व्यक्ती फिकिरींत पडलेल्या दिसत आहेत. अशा वेळीं आपण पं. शामजी कृष्णवर्मा यांचें कृतज्ञतापूर्वक स्मरण ठेवलें, त्या वेळच्या प्रतिकूल परिस्थितीला न जुमानतां त्यांनीं परराष्ट्रांत राजकारणी संबंधांचें जाळें कसें विणलें याची आपण जाणीव बाळगली आणि देशाच्या स्वातंत्र्यप्राप्तीचे नि रक्षणाचे त्यांनीं सुचविलेले अचूक मार्ग आपण दृष्टिआड होऊं दिले नाहींत तर एका विद्वान् देशभक्ताविषयींचें अगदीं साधें कर्तव्य आपण यथाशक्ति पार पाडलें, असें होईल.

# २. मदनलाल धिंग्रा

‘मुहूर्तं ज्वलितं श्रेयः न च धूमायितं चिरम्’ हें मोहक सुभाषित वापरण्याच्या भरांत अनेक जण न कळत एका अनर्थाला जबाबदार होत असतात. क्षणस्फूर्ति व प्रासंगिक प्रेरणा यांच्या योगानें एकाद्या व्यक्तीच्या हातून जें कर्तृत्व घडतें व जो पराक्रम सिद्ध होतो त्याची महति गाण्याच्या भरात हे लोक विवेकनिष्ठ स्फूर्ति व प्रयत्नांचें सातत्य यांच्या बळावर चालणाऱ्या उद्योगांची अवहेलना करीत आहेत कीं काय असा भास होऊं लागतो. हें सुभाषित वापरण्यांत कोणता संभाव्य धोका आहे याची पूर्ण जाणीव मनांत ठेवूनहि, मला असें म्हणावयाचें आहे कीं, ‘मुहूर्तं ज्वलितं श्रेयः न च धूमायितं चिरम्’ हें सुभाषित अत्यंत उदार आणि उदात्त अर्थानें हुतात्मा मदनलाल धिंग्रा यांच्या चरित्राला सर्वतोपरी लागू पडतें.

आपला क्षत्रिय बाणा कायम टिकवून धरणाऱ्या पंजाबातल्या हिंदु क्षात्रिय घराण्यांत धिंग्रा घराण्याचा अंतर्भाव होतो. मदनलालजींचे वडील पोलिस खात्यांत नोकरी करीत होते आणि १८८५ च्या सुमारास—म्हणजे मदनलालजींच्या जन्माच्या सुमारास—ते डी.एस्.पी. च्या हुद्यावर होते. सरकारदरबारांत मदनलालजींच्या वडिलांची प्रतिष्ठा मोठी असल्यामुळें व परिस्थितीची अनुकूलता असल्यामुळें मदनलालजींच्या वडिलांनीं आपल्या मुलांपैकीं अनेकांना इंग्लंडमध्यें विद्यार्जनासाठीं धाडण्याची महत्त्वाकांक्षा बाळगिली व ती त्यांनीं खरीहि करून दाखविली. मदनलालचें बालपण बऱ्याच द्वाडपणांत गेलें असल्यामुळें त्याला मात्र इंग्लंडला पाठविण्याची त्याच्या वडिलांची तयारी नव्हती. त्याचा स्वदेशांतला शिक्षणक्रम संपला असें समजून वडिलांनीं त्याला चतुर्भुज करून टाकला. विवाहानंतर कांहीं दिवसांनीं मदनलालजींना मुलगा झाला. ही स्वारी आतां संसारांत रंगली असें समजणारी घरांतली वडिलधारी मंडळी समाधानांत होती त्या वेळीं मदनलालजींच्या मनांत वेगळेच विचार घोळत होते.

आपल्या वडिलांनीं आपल्या हूडपणाचा एक विवक्षित अर्थ मनांत बसविला आहे, आपल्या हातून विद्यार्जन वगैरे होईल असें मानण्याला आपले वडील तयार नाहींत आणि त्यामुळें आपल्याला परदेशीं धाडण्यालाहि ते सिद्ध नाहींत हें मदनलालनें ओळखलें. पण वडिलांशीं भांडणतंटा करण्यांत त्यानें वेळ घालविला नाहीं किंवा निराशेच्या आहारीं जाऊन त्यानें आपला नाद सोडलाहि नाहीं. वडिलांचा आशीर्वाद नि आश्रय नसला तरी आपण परदेशीं जाऊं शकूं कीं नाहीं हा प्रश्न तो मनांत घोळवू लागला. स्वावलंबी तरुण म्हणून इंग्लंडला जावयाचें व इंजिनियर होऊन परत स्वदेशीं यावयाचें असें त्यानें मनाशीं ठरविलें. डॉक्टरीची विद्या हस्तगत करून मदनलालचे थोरले बंधु या विद्येचा उच्च अभ्यास करण्यासाठीं १९०६च्या मध्याच्या सुमारास इंग्लंडला गेले होते. त्याच्या मागून चारपाच महिन्यांतच मदनलाल इंग्लंडांत दाखल झाला. इंग्लंडात निघालेल्या एका आगबोटीवर आगवाल्याच्या मदतनिसाचें काम करण्याचें पत्करून त्यानें आपल्या प्रवास–खर्चाचा वगैरे प्रश्न सोडविला. इंग्लंडात पोंचून, इंडिया हाऊसमध्यें आपलें बस्तान बसवून, विनायकराव सावरकर यांनीं मॅझिनीचें लेखन पुरें केलें त्या सुमारास मदनलाल इंग्लंडमध्यें दाखल झाला.

इंजिनियरिंग विषयांत प्रावीण्य मिळवावयाचें असा मदनलालचा निर्धार झालेला असल्यामुळें लंडनला पोंचल्यावर थोडक्याच दिवसात त्यानें युनिव्हर्सिटी कॉलेज या संस्थेंत आपलें नांव दाखल केलें. रंगेलपणानें व उमदेपणानें वागणाऱ्या मदनलालभोंवतीं हळूहळू समवयस्क मित्राचें कोंडाळें जमा होऊं लागलें. पण या मित्रपरिवारात रंगणाऱ्या व हूडपणाचे अनेक प्रकार करणाऱ्या मदनलालचें आपल्या अभ्यासाकडे चागलेंच लक्ष होतें. मॅझिनीचें लेखन संपवून सावरकरांनीं १८५७ च्या स्वातंत्र्यसमरावरील आपला ग्रंथ लिहिण्याची तयारी चालविली होती. हा बौद्धिक उद्योग एकीकडे चालू असतांनाच सावरकर आणखीहि एका कामांत गुंतलेले होते. समवयस्क हिंदी विद्यार्थी गोळा करावे, त्यांच्याबरोबर भारताच्या भवितव्याची मनमुराद चर्चा करावी, त्यांच्यापैकीं अनेकांचे स्वभावविशेष पारखावे व त्यांना संघटित करावें या उद्योगांत सावरकर गुंतले होते. आपल्या संकल्पित उद्योगांतले जे उद्योग उघडपणें करण्याजोगे ठरतील ते करण्यासाठीं त्यांनीं १९०६

च्या शेवटीशेवटीं Free India Society या संस्थेची स्थापना केली. गुप्तपणानें करावयाच्या उद्योगाचीहि त्यांनीं या सुमारास योजना आंखली व काहीं शेलकी मंडळी एकत्र करून त्यांनीं अशा उद्योगांच्या सिद्धीसाठीं एक गुप्त मंडळ स्थापन केलें. या गुप्तमंडळांत जी निवडक मंडळी सुरुवातीलाच सामील झाली त्यात मदनलालजी धिंग्रा हे एक होते.

हळूहळू फ्री इंडिया सोसायटीमार्फत लंडनमधील मोठमोठ्या सभागृहातून प्रसिद्ध वक्त्याच्या व्याख्यानाचे कार्यक्रम पार पडूं लागले. सावरकराच्या योजनेनुसार इंडिया हाउसमध्यें आठवड्यांतून एकदा तरुणांच्या बैठकी होऊं लागल्या. आगाऊ ठरलेल्या वक्त्यानें ठरलेल्या विषयावर निबंध वाचून दाखवावा, निबंध वाचनानंतर निबंधात आलेल्या मुद्यांची चर्चा व्हावी व त्यानंतर अध्यक्षानीं चर्चेचा समारोप करावा असें या बैठकीचें सामान्य स्वरूप असे. व्यासपीठावर वक्तृत्व गाजविणारे नि बैठकींतल्या चर्चेत रंगणारे पुष्कळसे लोक बहुतांशीं बोलुकाका असतात असा मदनलालचा ग्रह झालेला असल्यामुळें, या सभा नि बैठका यांबद्दल त्याला मोठीशी आस्था वाटत नसे. ज्याचें भाषण व्हावयाचें ती व्यक्ति आदरणीय वाटत असली, ज्या विषयावर भाषण अगर चर्चा व्हावयाची तो विषय आकर्षक व महत्त्वाचा वाटला, इतर उद्योग संपले आहेत नि सवड आहे असें वाटलें किंवा लहर लागली तर मदनलालजी सभा—बैठकांकडे वळत असत. अशा सभाबैठकातून मिरवणाऱ्या मुसलमानाच्या मनोगताबद्दल मदनलालजी साशंक असल्यामुळें, त्याच्या लुडबुडीबद्दल ते उघड नापसंतीहि व्यक्त करण्याला चुकत नसत.

सभाबैठका, वाद—चर्चा इत्यादि कार्यक्रमांबद्दल मदनलालजींची वृत्ति अशी असली तरी, सावरकराचे नि त्यांचे संबंध फार जिव्हाळ्याचे होते. सावरकराच्या गुप्त उद्योगाशीं मदनलालजी किती तद्रूप झालेले होते, या तद्रूपतेला त्यांच्या अंगीं वसत असलेल्या साहसीपणाची नि सोशीकपणाची जोड मिळालेली असल्यामुळें सावरकराना ही तद्रूपता किती बहुमोल वाटत असे इत्यादि मुद्दे स्पष्ट करून सांगणारी त्या काळातली एक गोष्ट प्रसिद्ध आहे. १९०७ च्या उत्तरार्धात, बॉंब तयार करण्याची कृति हस्तगत झाल्यावर, सावरकर इंडिया हाउसमध्यें बॉंब बनविण्याचे प्रयोग करूं लागले. भारतभवनाच्या तिसऱ्या मजल्यावर असलेल्या माळ्यासारख्या एका खोलींत

सावरकर अपरात्रीं हे प्रयोग पुष्कळ वेळां करीत असत. बॉंबसाठीं लागणारें पिक्रिक ॲसिड हें रसायन-द्रव्य सावरकर एकदा अपरात्रीं तयार करीत बसले असताना मदनलालजी त्याच्याजवळ बसले होते. तापत चाललेलें कांचेचें भांडें आगीवरून उतरून घेण्याची वेळ तर झाली, भांडें उतरण्याचा चिमटा जवळ घेण्याचें तर आपण विसरलों, भांडें अधिक तापून फुटलें व ॲसिडचा स्फोट झाला तर सगळेंच बिंग बाहेर येईल असे विचार सावरकरांच्या मनांत घोळत होते व काय युक्ति योजावी हें ते मनाशीं ठरवीत होते. इतक्यात मदनलालनें बेडरपणानें हात पुढें केला व भांडें घट्ट धरून त्यानें तें चटकन् खालीं उतरून ठेविलें. तळहाताची कातडी पार पोळून निघाली होती तरी मदनलालजींनीं तिच्याकडे काडीमात्र लक्ष दिलें नव्हतें.

रूसो-जपानी युद्धांत विजयी झालेल्या जपानबद्दल व जपानी लोकांबद्दल अभिमानानें व आपलेपणानें बोलण्याची इंग्लंडमधल्या तत्कालीन हिंदी तरुणांना मोठी हौस वाटत असे. जपानची स्तुति करण्याच्या भरात स्वतःच्या हिंदुराष्ट्राबद्दल अधिक्षेपाचे उद्गार काढण्याचें कांहींच कारण नाहीं ही साधी गोष्ट विसरून एका हिंदु तरुणानें एकदा मदनलालजींच्या देखत हिंदुराष्ट्र व हिंदु तरुण यांचा अवमान होईल असे कांहीं उद्गार तोंडावाटे काढले. त्याबरोबर मदनलालजी चवताळून उठले व ' माझें हिंदुराष्ट्रहि तितकेंच शूर व साहसी आहे व आमच्या धाडसाचीहि लोक कीर्ति गाऊं लागतील ' असें त्यांनीं जागच्या जागीं बजावलें. मदनलालजींचें म्हणणें वल्गनेसारखें आहे, शरीरकष्ट व देशवीरत्व या गुणांत हिंदु लोक अढळ रहात नाहींत असें मदनलालजींच्या बरोबरच्या इतर तरुणांचें म्हणणें पडलें व शेवटीं हा वाद पैजेवर येऊन हिंदु तरुणांच्या साहसाची पारख करण्याचें ठरलें. एक टांचणी घेऊन ती मदनलालजींच्या हातावर ठोंचण्याला प्रारंभ करण्यांत आला. मदनलालजींचा हात जशाचा तसा अढळ होता! सगळी टांचणी हातांत रोंवली गेली व रक्त बाहेर उसळलें तरी मदनलालजींनीं हूं का चूं केलें नाहीं! हें पाहून इतर तरुण स्तिमित झाले होते. नेपाळच्या प्रधानांचें वास्तव्य लंडनमध्यें आहे या गोष्टीचा फायदा घेऊन या एकमेव स्वतंत्र हिंदु राज्याकडे क्रांतिकारक हिंदी तरुण कोणत्या दृष्टीनें पाहतात हें त्यांना पत्रद्वारा कळविण्याचें ठरलें. या पत्रावरील स्वाक्षऱ्या रक्तानें कराव्या असें ठरतांच, मदनलालजींनीं

आपल्या बोटावर आघात करून स्वातंत्र्यासाठीं आनंदानें रक्त दिलें होतें.

१९०८ च्या एप्रिल महिन्याच्या शेवटीं मुझफरपूर येथें बॉंबचा धडाका उडवून देऊन खुदिराम बसू या बंगाली तरुणानें स्वातंत्र्याकांक्षी भारत-वर्षाकडे जगाचे डोळे वळवून घेतले. या गोष्टीचा मदनलालजींसारख्या कृति-प्रिय तरुणाचे मनावर विलक्षण परिणाम झाला असला पाहिजे. १९०८ च्या मे महिन्यात लंडन येथील भारतभवनात १८५७ च्या स्वातंत्र्य-समरांतल्या हुतात्म्याचें स्मरण फार भव्य प्रमाणावर करण्यांत आलें. या समारंभांत मदनलालजींनीं अगदीं तन्मयतेनें भाग घेतला होता. या समारंभप्रसंगीं जी वीरस्मृतिमुद्रा तयार करण्यात आली होती ती धारण करण्यांत मदनलालजींना मोठा अभिमान वाटत होता. त्याच्या कोटावर चमकत असलेली ही मुद्रा कॉलेजमधल्या एका सहाध्यायानें चेष्टेनें दूर भिरकावून दिली. त्याबरोबर मदनलालजी इतके चवताळून गेले होते कीं, हातांत सुरा घेऊन ते त्या सहा-ध्यायाच्या अंगावर तुटून पडले होते.

खुदिराम बसूसारखीं कृतिप्रिय माणसें मरून अमर होण्याच्या मार्गाला लागलीं, आपणाला मात्र नीटसें मार्गदर्शन होत नाहीं, अशा विचारामुळें व्यग्र झालेलें मदनलालजींचें मन या व्यग्रपणांतून स्वतःची मुक्तता व्हावी म्हणून हुच्चपणा, हूडपणा, रंगेलपणा इत्यादींचा आश्रय करूं लागलें. सावर-कराच्या नजरेस हे प्रकार येत नसत असें नाही. पण मदनलालजींच्या मना-ची खरी ओळख त्याना पटलेली असल्यामुळे ते या प्रकाराकडे दुर्लक्ष करीत असत. असें होतें तरी, १९०८ च्या शेवटीशेवटीं एक प्रसंग असा घडला कीं, त्या प्रसंगीं सावरकराना मदनलालजींवर रागवावें लागलें. इंडिया हाउसमध्यें ज्या साप्ताहिक बैठकी होत असत त्या आतल्या बाजूच्या एका दालनांत होत असत. या दालनालगत सडकेच्या कडेच्या बाजूला दुसरें एक दालन होतें. साप्ताहिक बैठक सुरू होऊन वक्तृत्व रंगत चाललें होतें तर शेजा-रच्या खोलींत मदनलालजींचा कार्यक्रमहि ऐन रंगांत आला होता. दालनाच्या खिडकीपाशीं उभे राहून मदनलालजी ग्रामोफोनच्या तबकड्या लावीत आहेत व खिडकीबाहेर सडकेवर अल्लड पोरींचा भला मोठा घोळका जमला आहे असें दृश्य त्या ठिकाणीं दिसत होतें. प्रेयसीला उद्देशून म्हटलेल्या एका इंग्लिश गाण्याचे आलाप घोळघोळून तबकडीतून पुनरुक्त होत आहेत व त्या

आलापाशीं तन्मय झालेल्या पोरी खिदळत, लकेऱ्या काढीत आहेत असा प्रकार बाहेर घडत असल्यामुळें, साप्ताहिक बैठकींतल्या वक्तृत्वाचे चांगलेच तीनतेरा वाजले ! बैठकींत बसलेल्या सावरकराना या हास्यविनोदाचा सूत्रधार कोण हें कांहींच कळेना ! म्हणून ते बाहेर आले नि पाहतात तों मदनलाल ! तेव्हां रागाचा आविर्भाव दाखवून ते मदनलालजींना म्हणाले : हें रे काय ! कृतीच्या आणि हौतात्म्याच्या गोष्टी बोलतोस व हौतात्म्य श्रेष्ठ म्हणून बैठकी नि चर्चा टाळतोस ! हीं सगळीं हौतात्म्याचींच लक्षणें वाटतें ! बैठकींना यावयाचें नसेल तर येऊं नको; पण, बैठकींचा बेरंग होईल असें तरी कांहीं करूं नको ! सावरकराचे हे शब्द ऐकून मदनलालजी फार खजिल झाले ! ग्रामोफोन, तबकड्या, वगैरे सारा पसारा हातोहात आंवरून ते तेथून अदृश्य झाले ! तीन चार दिवस पावेतों ते भारतभवनाकडे फिरकलेदेखील नाहींत.

घडलेल्या प्रकाराबद्दल मनाशीं भरपूर भवति न भवति करण्यात तीनचार दिवस घालविल्यावर मदनलालजींनीं मनाशीं काहीं निश्चय केला व आपले नेते सावरकर याची गांठ घेण्याचें ठरविलें. सावरकर आपल्यावर खूप रागावले आहेत, भेटल्यावर ते आपल्याशीं बोलतील कसे नि वागतील कसे अशा अनेक शंका मनांत उद्भवत असल्यामुळें, सावरकराची अगदीं एकातांत भेट घेणेंच मदनलालजींना श्रेयस्कर वाटले. मदनलालजी भारतभवनात गेले ती वेळ सायंकाळची होती. जेवणाआधींचे मुखमार्जनादि विधि उरकण्यासाठीं सावरकर आडोशाच्या भागाकडे गेले आहेत हे मदनलालजींना कळलें नि ते बाहेर येतील तेव्हांच त्याना गांठावें असें ठरवून, ते सावरकराच्या वाटेवर त्यांची मार्गप्रतीक्षा करीत उभे राहिले. सावरकर आपल्या खोलीकडे निघाले तोंच त्या एकात भागात मदनलालजी आपली वाट पहात उभे आहेत असें त्याच्या ध्यानात आलें. सावरकराना पाहतांच मदनलालजी अधोमुख झाले. सावरकरांनीं नेहमींप्रमाणें मनमोकळेपणानें बोलण्याला सुरुवात केली. आपल्यावरचा सावरकरांचा लोभ उणावलेला नाहीं अशी खात्री पटतांच मदनलालजीहि मोकळेपणानें बोलूं लागले. हौतात्म्य गाजविण्याची वेळ खरोखरच प्राप्त झाली आहे का, हा प्रश्न मदनलालजींच्या मनांत घोळत होता. सावरकर या प्रश्नाचें जें उत्तर देतील त्याच्या अनुरोधानें आपला पुढील वर्तनक्रम आंखा-

-वयाचा, असें त्यांनीं ठरविलें होतें. त्यामुळें हा प्रश्न सावरकरांना विचारून ते उत्तराकडे लक्ष देऊं लागले. 'हुतात्म्याचें मन खंबीर बनलें असेल व तें सर्व परिणाम सहन करण्याला सिद्ध झालें असेल तर त्या सिद्धतेंत प्रायः हे गर्भि-तच असतें कीं, हौतात्म्य गाजविण्याची वेळ प्राप्त झालेली आहे' या सावरकरांच्या तात्कालिक उत्तरात जो सूचितार्थ सांठलेला होता त्याची चिकित्सा अशी उभ्या उभ्या होण्यासारखी नसल्यामुळें, मदनलालजी सावर-करांच्या समवेत त्यांच्या खोलींत गेले. सावरकरांच्या खोलींत जाऊन बसल्या-वर आपण हुतात्मा म्हणून प्राणसमर्पण करण्याची सिद्धता केली आहे, असें मदनलालजींनीं सावरकरांना सांगितलें.

यानंतरच्या तीनचार दिवसांत मदनलालजींनीं इंडिया हाउसमध्यें अनेकवार खेपा घातल्या. इंजिनियरिंगचे विद्यार्थी म्हणून श्री. कोरगावकर नावाचे एक तरुण मदनलालजींच्या उत्तम परिचयाचे झालेले होते. सावरकर व मदनलालजी यांनीं एकांतात बसून या तीन चार दिवसात जीं खलबतें केलीं त्या खलबतांचे वेळीं श्री. कोरगांवकर हेहि उपस्थित असत. देशहित-बुद्धीनें प्रेरित झालेला मदनलालजींसारखा उमदा तरुण प्राणार्पण करण्याला सिद्ध झाला म्हणजे, त्याचें हौतात्म्य विफल ठरूं नये—होणारा त्याग प्रमाणबद्ध व प्रभावशाली ठरावा—एतदर्थ नेत्यानें जी खबरदारी घ्यावयाला पाहिजे ती घेऊन सावरकरांनीं मदनलालजींनीं या पुढील काळांत कसें कसें वागावें याचें स्थूलमानानें दिग्दर्शन केलें. 'अचूक यत्न तो देवो, चुकणें दैत्य जाणिजे' या समर्थवचनाचें मर्म लक्षांत घेऊन या त्रयीनें असें ठरविलें कीं, जें कांहीं अखेरीस करावयाचें तें बिनचूकपणानें व बेमालूमपणानें करावयाचें !

या चर्चेनंतर थोड्याच दिवसांनीं मदनलालजींनीं रिव्हॉल्व्हरचा परवाना आपल्या नांवें मिळावा अशासाठीं खटपट सुरू केली व परवाना हातीं पड-तांच, दि. २६-१-१९०९ रोजीं गमेज कंपनीच्या दुकानांतून त्यांनीं एक सहा बारी कोल्ट रिव्हॉल्व्हर तीन पौंड पांच शिलिंग किंमतीला विकत घेतलें रिव्हॉल्व्हर वापरण्याचें शिक्षण राजरोसपणानें घ्यावयाचें असें ठरवून हें शिक्षण कोठें चांगल्या प्रकारें घेतां येईल याविषयींचा तपास त्यांनीं सुरू केला. टॉटेनहॅम कोर्ट यार्ड या ठिकाणीं राहणारे जॉन स्टॅंटन मोर्ले हे शिक्षक म्हणून पसंत करून मदनलालजी त्यांच्याकडे अध्ययनासाठीं जाऊं लागले. आठवड्यांतु

दोन वेळा या ठिकाणीं जावयाचें व भिन्नभिन्न अंतरांवरील लक्ष्यांवर मिळून दर वेळा बारा पंधरा गोळ्या झाडावयाच्या, असा क्रम त्यांनीं सुरू केला. कांहीं गोळ्या ताड्ताड् एका पाठोपाठ एक अशा पद्धतीनें झाडावयाच्या तर कांहीं गोळ्या संथपणानें, थोडा फार वेळ मध्यंतरीं जाऊं देऊन झाडावयाच्या असा मदनलालजींचा रिवाज होता. बारा गोळ्या वापरण्याबद्दल मदनलालजींना या ठिकाणीं दर वेळीं सहा पेन्स द्यावे लागत असत.

बड्या बड्या इंग्रज स्त्रीपुरुषाचे समुदाय ज्या ठिकाणीं व ज्या संस्थातून मोकळपणानें जमतात व एकत्र कालक्रमणा करतात अशा ठिकाणाचा व अशा संस्थाचा परिचय करून घेणें हेंहि मदनलालजींना आपल्या इष्ट हेतूच्या सिद्धीच्या दृष्टीनें अवश्य वाटूं लागलें. नॅशनल इंडियन ॲसोसिएशन ही संस्था व या संस्थेच्या कार्यवाहाचें काम करणाऱ्या मिस् एमा जोसेफिन बेक या बाई याची मदनलालजींनीं मार्च महिन्यात चांगली ओळख करून घेतली. संस्थेचे आधारस्तंभ म्हणून मान्यता पावलेले बडे लोक कोण आहेत, संस्थेच्या सभासदाचे वर्ग किती आहेत व प्रत्येक वर्गातल्या सभासदांचे अधिकार काय आहेत, आपल्याला संस्थेंत प्रवेश मिळण्याची शक्यता कितपत आहे वगैरे माहिती मिळवून मदनलालजी हे एप्रिल महिन्याच्या सुमारास या संस्थेचे Associate Member झाले. इंग्लंडात येऊन राहिलेल्या हिंदी विद्यार्थ्यांचें इंग्लिश स्त्रीपुरुषांशीं दळणवळण वाढावें यासाठीं सरकारी प्रेरणेनें या सुमारास बरेच प्रयत्न चालले होते. Associate Member हा सभासदत्वाचा सवलतीचा प्रकार याच हेतूनें निर्माण करण्यात आलेला होता. पांच शिलिंग ही सवलतीची वार्षिक वर्गणी भरून मदनलालजी Associate Member झाले व इतर सभासदांना मिळणारे बहुतेक सर्व अधिकार त्यांना मिळूं लागले. भारतमंत्री लॉर्ड मोर्ले याचे एक सल्लागार सर कर्झन वायली हे आपल्या कुटुंबाचे चाहते आहेत, आपले ज्येष्ठ बंधु व वायलीसाहेब यांचा पत्रव्यवहारहि चालतो या माहितीचा फायदा घेऊन मदनलालजी या सुमारास वायलीसाहेबाचा विश्वास संपादन करूं लागले. हिंदी विद्यार्थ्यांच्या गोटांत ज्या अनेक उलाढाली चाललेल्या असत त्यांची अल्पस्वल्प माहिती बड्या बड्या इंग्रजाना पुरविण्याची बतावणी करून मदनलालजी या इंग्रजांचा विश्वास अधिकाधिक प्रमाणांत संपादूं लागले; पण, मदनलालजी किती खोल बुद्धीनें व काय

हेतूनें वागत आहेत हें त्याच्या बरोबरीच्या अनेक हिंदी तरुणांना अवगत नसल्यामुळें, त्यांच्या या वर्तनामुळें त्याच्या सहकाऱ्यापैकींच कित्येक जणांच्या मनांत त्यांच्याबद्दल गैरसमज नांदूं लागले.

मदनलालजी फितूर झाले आहेत असा त्यांच्या सहकाऱ्यांपैकीं कांहीं जणाना संशय आला ! 'फ्री इंडिया सोसायटी' ही उघडपणें करावयाचें काम करण्यासाठीं स्थापण्यात आलेली संस्था होती व 'अभिनव भारत' ही गुप्तपणानें करावयाच्या कामाच्या सोईसाठीं निर्माण करण्यात आलेली संस्था होती. या संस्थातून मदनलालजींची हकालपट्टी करण्याबद्दलच्या सूचना करण्यांत येऊं लागल्या. १९०९ सालीं मे महिन्याच्या शेवटींशेवटीं तर या संशयखोर मंडळींनीं कमालच केली. फ्री इंडिया सोसायटीच्या सभासदाच्या यादींतून मदनलालजींचें नाव कमी करावें असा प्रस्ताव त्यांनीं सावरकराच्या समक्ष मांडला तेव्हा सावरकरांची मोठी पंचाईत झाली. मदनलालजींच्या वर्तनाचा अन्वयार्थ उलगडून सांगणें त्याना त्या वेळीं शक्य नव्हतें; पण मदनलालजींचा कमीपणा व्हावा हेंहि त्याना संमत नव्हतें. मध्यम मार्ग पत्करून वेळ मारून नेण्याचें त्यानीं ठरविलें. 'मदनलाल आपला इतक्या दिवसांचा सहकारी आहे; एकदम त्याला काढून टाकणें बरें नव्हे; थोडे थांबूं या; मी-हि त्याच्यावर नजर ठेवतों; त्याच्या वर्तनांत कांहीं फरक झाला नाहीं तर काय करावयाचें तें पाहूं' असें सहकाऱ्याना सांगून सावरकरानीं प्रसंग निभावून नेला.

आपण ठरविलेला बेत पार पाडण्याची अशी तयारी करीत असतांना मदनलालजी दुसऱ्या बाजूला आपल्या इंजिनिअरिंगच्या परीक्षेचीहि तयारी जोरानें करीत होते. भारतभवनांतील जाणेंयेणें कमी केल्यावर मदनलालजी मिसेस हॅरिस या बाईच्या घरीं राहूं-जेवूं लागले. मे महिन्याच्या सुमारास मदनलालजी परीक्षा देऊन मोकळे झाले व परीक्षेचा निकाल लागला कीं थोडक्याच दिवसांनीं—म्हणजे सप्टेंबर—ऑक्टोबरच्या सुमारास--आपण स्वदेशीं परत जाणार असेंहि लोकांना सांगण्याला त्यानीं सुरुवात केली. मदनलालजींनीं ज्या बडया इंग्रजाशीं दाट ओळख केली होती त्यांत सर विल्यम कर्झन वायली हे होते. मे महिन्यांत कर्झन वायलींच्या निमंत्रणावरून मदनलालजी एकवार त्यांना मुद्दाम भेटले. सरसाहेबांनीं मदनलालजींना सभ्यपणें व दूर-

दर्शीपणानें वागण्याचा उपदेश केला. भारतभवनातल्या तरुणांशीं असलेला पूर्वीचा स्नेहसंबंध मी केव्हाच संपविला आहे, आतां मी केव्हां तरी तिकडे वळतों तो केवळ तिकडची बातमी मिळवून ती आपल्याला कळविण्यासाठीं वळतों, असें मनमोकळें उत्तर देऊन मदनलालजी मोकळे झाले !

इंजिनियरिंगच्या परीक्षेला बसून आपण त्या बाजूचें आपलें उद्दिष्ट साधलें, मनात योजलेलें आपलें दुसरें उद्दिष्ट साधण्याच्या दृष्टीनें व्हावयाची आपली तयारीहि पूर्ण झाली, आतां नुसते बेत नि विचार करीत वेळ घालवण्यांत कांहीं अर्थ नाहीं हे विचार मदनलालजींच्या मनांत घोळूं लागले व त्यामुळें ते विचार-मग्न व गंभीर बनूं लागले. अशा प्रक्षुब्ध मनःस्थितींत मदनलालजी काळ कंठीत आहेत तों ८ जून हा दिवस उजाडला व त्या दिवशीं दुपारच्या सुमारास गणेशपंत सावरकर यांना मुंबई येथें जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा सांगण्यांत आल्याचें वृत्त मदनलालजींच्या कानीं पडलें. आपल्या पुढाऱ्याच्या ज्येष्ठ बंधूला सांगण्यांत आलेल्या या अमानुष शिक्षेचा तत्काळ सूड उगवावा असा विचार मदनलालजींच्या मनात आला. आज रात्रौ 'रॉयल कलोनियल इन्स्टिटयूटच्या' वतीनें बंगालचे भूतपूर्व ले. गव्हर्नर सर बॅम्फील्ड फुल्लर यांचें Indian Aspirations या विषयावर लॉर्ड कर्झन यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान ठरलें आहे, या गोष्टीचें त्याना स्मरण झालें. कर्झन अगर फुल्लर यांपैकीं कोणाला तरी उडविण्याच्या दृष्टीनें ही व्याख्यानाची संधि नामी ठरेल असें हेरून मदनलालजी तयारीनिशीं व्याख्यानाच्या जागीं गेले ! पण, त्यांना थोडा उशीर झाल्यामुळें ते तेथें पोंचण्यापूर्वीच सभास्थानाचे दरवाजे बंद करून टाकण्यांत आले होते. कांहीं वेळ बाहेर ताटकळत उभे राहून व निराश होऊन मदनलालजी त्या दिवशीं रात्रौ आपल्या निवासस्थानीं परत आले.

फिरून प्रयत्न करावयाचा तो यशस्वी झालाच पाहिजे, त्यांत अर्धवटपणा मुळींच शिरूं द्यावयाचा नाहीं असा निर्धार करून मदनलालजी पुढच्या उद्योगाला लागले. १ जुलै रोजीं रात्रौ 'नॅशनल इंडियन असोसिएशन' या संस्थेचा वार्षिक समारंभ इंपीरियल इन्स्टिटयूटच्या जहांगीर हॉलमध्यें साजरा होणार आहे अशी माहिती मिळतांच मदनलालजींनीं या समारंभाविषयींचा सारा तपशील आपल्याला विदित व्हावा म्हणून खटपट सुरू केली. या समा-

सा. क.—३

रंभासाठीं गोळा होणाऱ्या दोनशें शेलक्या मंडळींत सर कॉवसजी जहांगीर, प्रिन्सेस सोफिया दुलीपसिंग, फाझलखान करीमभाय इब्राहिम वगैरे हिंदी स्त्रीपुरुष असून, सर कर्झन वायली हे सपत्नीक समारंभाला उपस्थित राहणार आहेत असें त्याना समजलें. संस्थेच्या चिटणीस मिस् बेक याच्याकडून त्याना अशीहि माहिती मिळाली कीं, समारंभाचे वेळीं अभ्यागतांचें स्वागत करण्याचें काम सर चार्लस लायल व त्यांच्या पत्नी या जोडप्यावर सोपविण्यात आलें आहे. समारंभाला हजर राहणाऱ्या हिंदी स्त्रीपुरुषांनीं आपआपला स्वदेशी पोषाख करून यावें अशीहि सूचना व्यवस्थापकाकडून देण्यात आली असल्याचें मदनलालजींच्या ध्यानीं आलें.

मदनलालजी ही सर्व माहिती गोळा करीत असतांनाच जून महिना संपला व समारंभाला फक्त एक दिवस उरला! जून महिन्याच्या ३० तारखेला संध्याकाळच्या वेळीं मदनलालजी सावरकराना भेटावयास गेले. सावरकर हे या सुमारास इंडिया हाऊस सोडून श्री. बिपिनचंद्र पाल याच्या निवासस्थानीं रहात होते. मदनलालजी या ठिकाणीं आले त्या वेळीं त्यांची चित्तवृत्ति फार उल्हसित दिसत होती. सावरकर कोठें तरी बाहेर गेले आहेत असें समजल्यावर, इतर कोणाशीं फारसें न बोलताच ते परत फिरले. मदनलालजी काय विचारांत आहेत याची कल्पना सावरकरांना यापूर्वीच आलेली होती. इंपीरियल इन्स्टिटयूटमधील समारभाला कोरगांवकर यानींहि जावें असें त्यांनीं मदनलालजींशीं विचारविनिमय करून ठरविलें होतें. श्री. ग्यानचंद वर्मा या आपल्या सहकाऱ्याला विश्वासांत घेऊन, सावरकरांनीं दि. २९ जून रोजीं त्याला वरील समारंभाला जाण्याचा आदेश दिला. दि. ३० ला सायंकाळीं न झालेली सावरकर–मदनलाल भेट त्या रात्रीं केव्हांतरी झाली. सावरकरांजवळ असलेल्या रिव्हॉल्व्हर्सपैकीं एक रिव्हॉल्व्हर घेऊन व कांहीं विचारविनिमय करून मदनलालजींनीं आपल्या नेत्याला अभिवादन केलें व त्याचा निरोप घेऊन ते स्वस्थानीं परतले.

१ जुलै या दिवशीं दुपारपर्यंतचा वेळ मदनलालजींनीं प्रायः मामुली रीतीनें दवडला. आपल्या संकल्पित कृत्याचे परिणाम प्रत्यक्ष दृष्टीसमोर चमकूं लागले तरीहि आपल्या मनानें कातर बनूं नये व जिभेनें दगा देऊं नये यासाठीं त्यांनीं आपल्या निश्चयी मनाला या वेळांत आणखी कांहीं निरगांठी

मातल्या असल्या तर तें स्वाभाविक आहे. मला संध्याकाळीं जेवावयाचें नाहीं असें त्यांनीं आपली घरमालकीण मिसेस मेरी हॅरिस हिला सांगून टाकलें व मधल्या वेळचें खाणें नेहमीपेक्षा अगोदर वाढण्याचीहि त्यानीं या बाईला सूचना दिली. खाणेंपिणें उरकून दुपारीं दोन वाजण्याच्या सुमारास मदन-लालजी बिऱ्हाडाबाहेर पडले. आपल्या नेमबाजीच्या शाळेंत जाऊन त्यांनीं रिव्हॉल्व्हरसेचे बारा बार उडविले व वापरलेल्या स्फोटकाबद्दल त्यानीं रीतसर पैसे चुकते केले. तुमच्यासारख्या नेहमींच्या गिऱ्हाइकाकडून आपण या-पुढें सवलतीच्या दरानें पैसे घेत जाऊं असें मदनलालजींच्या पंतोजीनें त्याना सांगितलें. रिव्हॉल्व्हरची साफसुफी करून घेऊन मदनलालजी या ठिकाणाहून बाहेर पडले. सहा वाजण्याच्या सुमारास बिऱ्हाडीं परत आल्यावर मदनलालजी रात्रीच्या समारंभाला जाण्याची सिद्धता करूं लागले. त्यांनीं आपला नेहमींचा कोट अंगात चढाविला; जवळचीं तिन्ही रिव्हॉल्व्हर्स नीट भरून, तीं त्यांनीं खिशातून जागच्या जागीं ठेवून दिलीं. नुकताच हस्तगत केलेला एक खंजीर व बारा इंच लांबीचा एक सुरा या चिजाहि म्यानात घालून त्यानीं त्या खिशात दडवून ठेवल्या. पंचहत्यारी बनून मदनलालजी घराबाहेर पडण्याला सिद्ध झाले तों सायंकाळचे सात वाजून गेले होते. निघण्याच्या वेळीं त्यानीं अस्मानी रंगाची पंजाबी पगडी डोक्यावर चढविली व डोळयावर ऐटबाज चष्माहि ठेवून दिला !

मदनलालजी समारंभाच्या जागीं आले तेव्हा आठ वाजण्याचा सुमार झालेला होता. निमंत्रिताना देण्यांत आलेली प्रवेशपत्रिका त्याच्याजवळ नव्हती. पण, ज्या संस्थेतर्फे समारंभ व्हावयाचा तिचे सगळे रिवाज त्याना अवगत असल्यामुळे त्यांनीं एका नोंदणीबुकात स्वाक्षरी केली व प्रवेश मिळण्याची पक्की व्यवस्था करून टाकली. जहांगिर हॉलमध्यें शिरून ते हळूहळू गोळा होत चाललेल्या मंडळींपैकीं अनेकांशीं गप्पा मारूं लागले. ९-९॥ च्या सुमारास बहुतेक सारी मंडळी गोळा झाली. सर कर्झन वायली व त्याच्या पत्नी यांना सेव्हॉय हॉटेलमधील एका खान्याचें निमंत्रण असल्यामुळें हें जोडपें कांहींसें उशीरा आलें व समारंभांत सामील झालें. अकरा वाजेपर्यंत समारंभ मोठ्या उत्साहानें चालला होता. त्यानंतर मंडळी हळूहळू पांगू लागली. कर्झन वायलीसाहेबांच्या पत्नी खालच्या मजल्यावर असलेल्या खोलींत ठेवलेले

आपले जड कपडे आणण्यासाठीं तिकडे वळल्या. समारंभाच्या गर्दीत ज्याच्याशीं बोलतां आलें नव्हतें अशा काहीं हिंदी प्रतिष्ठितांशीं बोलत वायली-साहेब उभे होते. या प्रतिष्ठिताच्या रांगेत मदनलालजी उभे राहिले व पुढची मंडळी दूर सरताच ते वायलीसाहेबासन्निध गेले. अगदीं हलक्या आवाजांत मदनलालजी बोलूं लागले. त्यांचें बोलणें नीट ऐकूं यावें म्हणून वायलीसाहेब मदनलालजींच्या अगदीं जवळ गेले. मदनलालजींचें तोंड व साहेबांचा कान एकमेकाना अगदीं भिडले असें म्हटलें तरी चालेल.

मदनलालजी एकीकडे बोलत होते; पण दुसरीकडे त्यांचें मन विचार-मग्न होतें. आपण हेरीत असलेली संधि एकदाची आली आहे, आपलें सावज आतां पुरतेपणीं आपल्या तावडींत सांपडलें आहे, पळाचाहि विलंब न करता आतां एकदम झेप घातली पाहिजे असें मदनलालजी मनांत ठरवीत होते. मनाचा निश्चय होतांच, त्यांनीं खिशांतलें बेल्जम रिव्हॉल्व्हर बाहेर काढलें व वायलीसाहेबाच्या डोळ्याचा नेम धरून त्यांनीं पहिला बार उडविला. रिव्हॉल्व्हर दिसतांच वायलीसाहेब पांचचार पावलें मागें सरकलें. पहिल्या-गोळीमागोमाग मदनलालजींनीं दुसरी, तिसरी व चौथी गोळी झाडली. वायलीसाहेब गतप्राण होऊन जमिनीवर पडले. पूर्वीं शांघाय येथें असलेले डॉ. कावस लाल्काका हे पारशी डॉक्टर समारंभाला आलेले होते. पहिले दोन बार उडताच ते वायलीसाहेबांच्या मदतीला म्हणून धावून आले. रिव्हा-ल्व्हरमधली पाचवी गोळी त्याच्यावर झाडून मदनलालजींनीं त्यांनाहि तत्काळ भुई-सपाट केले. रिव्हॉल्व्हरमधली शेवटची म्हणजे सहावी गोळी स्वतःवर उडवून घेऊन आत्महत्या करण्याचा मदनलालजींचा विचार होता; पण, तो फसला. खिशातलें दुसरें रिव्हॉल्व्हर काढून मदनलालजी आणखी कांहीं करणार तोंच सर लेस्ली प्रोबिन यानीं हळूच मागून जाऊन त्याचा उजवा हात पकडला. सारी शक्ति एकवटून त्यांनीं मदनलालजींचा दुसरा हातहि घट्ट पकडून ठेविला. मदनलालजींनीं झटापट सुरू केली त्यांत प्रोबिनसाहेबांचें मनगट पिळवटून निघालें. बेभान बनलेल्या मदनलालजींनीं प्रोबिनसाहेबाला रट्टे लगावण्याला सुरवात केली. त्यामुळें त्याच्या दोन बर-गड्या पिंजून निघाल्या व अंगांतून निघालेल्या रक्तानें त्याच्या शर्टच्या छातीचा भाग माखून गेला. इतक्यांत मदनमोहनसिंग नांवाचा एक हिंदी

विद्यार्थी साहेबाच्या मदतीला आला. या दुकलीपुढें आपलें यापुढें कांहीं चालणार नाहीं असें वाटून मदनलालजींनीं प्रतिकार थांबविला. मदन मोहन खिंगानें मदनलालजींच्या हातांतलें रिव्हॉल्व्हर काढून घेतलें व त्याना जामिनी-वर उताणें पाडून धरून ठेविलें. या झटापटींत मदनलालजींचा चष्मा शेजारच्या खुर्चीजवळ जाऊन पडला. जामिनीवर पडलेले मदनलालजी हंसत-हंसत म्हणाले, तेवढा चष्मा घेऊं दे ना मला ! चष्मा घेऊन त्यानीं तो डोळ्यावर चढवून दिला.

समारंभ संपवून परत निघालेली जी मंडळी खालीं तळमजल्यावर रेंगा-ळत किंवा वाट पहात उभी होती त्याच्या लक्षात वर झालेली ही गडबड आली. त्याबरोबर ती मंडळी घाईघाईनें वर आली. फाझलभाय करीमभाय इब्राहिम, डॉ. जॉन बुकानन, डॉ. थॉमस नेव्हिल वगैरे मंडळींप्रमाणेंच वायली साहेबांची पत्नीहि वर आली. घडलेला सर्व प्रकार पूर्णपणें लक्षात आल्यावर या बाईंनीं हंबरडा फोडला ! डॉक्टरानीं वायलीसाहेबाची तपासणी केली; पण, तपासण्याजोगें तेथें कांहींच शिल्लक उरलें नव्हतें. लालकाकाच्या शरी-रांत थोडी धुगधुगी असल्याचें डॉक्टराना आढळलें; म्हणून त्यानीं त्याची रुग्णालयाकडे रवानगी केली. डॉक्टरांनीं मदनलालजींचीहि नाडी तपासली. ती अगदीं संथपणानें चाललेली पाहून डॉक्टर स्तिमित झालें. इतका प्रकार होत आहे तो पोलिस अधिकारी तेथें येऊन दाखल झाले. त्यानीं मदनलाल-जींना आपल्या ताब्यात घेतलें व त्याच्याजवळ असलेलीं हत्यारें, त्याच्या खिशात असलेले कागदपत्र वगैरे सर्व वस्तू त्यानीं स्वाधीन करून घेतल्या. आपला संकल्प सिद्ध झाला म्हणजे पुढें केव्हातरी न्यायालयात आपले म्हणणें म्हणून कांहींतरी सागावें लागेल हे आगाऊ ओळखून, मदनलालजींनीं ते एका कागदावर लिहून ठेविलें होतें. पोलिसांनीं मदनलालजींच्या कोटाचे खिसे तपासले तेव्हां हा कागद त्याच्या हातीं आला. पोलिसांनीं मदनलालजींना वॉल्टन स्ट्रीट पोलिस ठाण्यावर नेलें. मदनलालजींपाशीं सांपडलेलीं हत्यारें जशीं त्यानीं बंदोबस्तानें ठेवलीं त्याप्रमाणें हा कागदहि त्यांनीं बंदोबस्तानें एका पेटींत कुलूपबंद करून टाकला ! पोलिस स्टेशनमध्यें पोंचल्यावर थोड्याच वेळात मदनलालजी झोंपी गेले व त्यांना अगदीं गाढ झोंप लागली !

मदनलालजींनीं रात्रीं केलेल्या कृत्याचें अत्यंत त्रोटक वृत्त दुसऱ्या दिवशीं सकाळीं लंडनमध्यें प्रसिद्ध झालेल्या दैनिक वृत्तपत्रातून प्रसिद्ध झालें. त्यामुळें सगळ्या शहरभर खळबळ उडाली व तोच एक चर्चेचा नि कुतूहलाचा विषय होऊन बसला. ड्रेपर नावाचा हेरखात्यातला एक अधिकारी त्या दिवशीं सकाळीं मदनलालजी रहात असत त्या जागीं गेला व त्यानें त्या जागेची झडती घेतली. कोर्टांत देण्यासाठीं म्हणून मदनलालजींनीं तयार केलेल्या जबाबाची एक प्रत जशी त्याच्या खिशात सापडली तशी त्या जबाबाची एक प्रत झडतीच्या वेळीं कुलूपबंद पेटींत सापडली. ड्रेपरनें हीहि प्रत मोठ्या बंदोबस्तानें ठेवून दिली. त्या दिवशीं दुपारीं मदनलालजींना वेस्ट मिन्स्टर पोलिस कोर्टांत उभें करण्यात आलें. आरोपीच्या पिंजऱ्यात मदनलालजी शांत-पणें उभे होते. खिशात हात कोंबून ऐटीनें उभे राहून ते सगळीकडे गंभीर-पणानें पहात होते. निकोल्स नावाच्या कॉन्स्टेबलनें आदल्या रात्रीं घडलेली हकीकत सांगितली. दोघा जणाचा खून केल्याचा या इसमावर आरोप आहे असें त्यानें म्हटलें. त्यावर मदनलालजी हंसून म्हणाले, लालकाका याचा मी जाणूनबुजून खून केलेला नाहीं; त्याची व माझी ओळखहि नव्हती. मला धरण्यासाठीं ते पुढें सरसावले तेव्हा आत्मरक्षणासाठीं मी त्याच्यावर गोळी झाडली, इतकेंच ! मदनलालजींना एक आठवडा कच्च्या कैदेत ठेवण्याचा मॅजिस्ट्रेटनें हुकूम दिल्यावर, मदनलालजींची तुरुंगाकडे रवानगी करण्यात आली.

वॉल्टनस्ट्रीट पोलिस स्टेशनमधून मदनलालजींना हलविण्यात आले, त्या दिवशीं सकाळीं घडलेला एक प्रकार मदनलालजींच्या दूरदर्शीपणाची उत्तम साक्ष पटविणारा आहे. ‘ तुमच्या कोणा इष्टमित्रांना काहीं निरोपबिरोप धाडायचा आहे का ?’ असें इन्स्पेक्टर चार्लस ग्लास यानें मदनलालजींना विचा-रलें. या सूचक प्रश्नाची खोंच मदनलालजींच्या ताबडतोब लक्षात आली. आपल्या काहीं मित्रांचीं नावे आपल्या तोंडून सहज निघालीं तरी पोलिस त्यातून हवे ते निष्कर्ष काढतील व त्यामुळें आपल्या मित्रांचा मनस्वी छळ होईल, हें मदनलालजींच्या ध्यानांत आलें. म्हणून त्यांनीं ग्लासला सांगितलें : माझ्या मित्रांना हळूहळू सर्व काहीं कळेलच ! मुद्दाम नि घाईनें त्याना काहींच कळवायचं नाहीं मला !

मदनलालजींनीं केलेल्या कृत्याचा निषेध करणाऱ्या मंडळींत त्याचे जन्मदाते वडील प्रमुख होते. गव्हर्नर जनरल मिंटोसाहेब यांच्याकडे तार धाडून त्यांनीं आपलें हृद्गत व्यक्त केलें. लंडनमध्यें असलेल्या प्रमुख हिंदी मंडळींपैकीं सुरेंद्रनाथ बानर्जी प्रभृतींनीं मदनलाल धिंग्राच्या कृत्याचा निषेध करताना असे आग्रहपूर्वक सांगण्यास सुरुवात केली कीं, या कृत्यामागें कट नाहीं व या कृत्याचा राजकीय सुधारणाच्या मागणीपाशीं कसलाहि संबंध नाहीं. दि. ५ जुलै रोजीं संध्याकाळीं कॅक्स्टन हॉलमध्यें भरलेली निषेधसभा तर चांगलीच गाजली. कर्झन वायली व लालकाका यांच्या मृत्यूबद्दलचें दुःख व्यक्त करण्याच्या भरात कित्येक वक्त्यांनीं मदनलालजींवर तोंडसुख घेतलें; यामुळे सभेचें वातावरण थोडें तापलेंच होतें. मदनलालजींच्या निषेधाचा ठराव सभेपुढें मांडण्यात आला इतक्यात इंडिया कौन्सिलचे एक सदस्य थिओडर मॉरिसन हे मदनलालजींच्या धाकट्या भावाचा हात धरून व्यासपीठावर चढले. विद्यार्थीदशेंत असलेल्या या मुलाला मॉरिसनसाहेबांनीं कांहीं वाक्यें पढवून ठेविलीं होतीं. तीं उच्चारून त्यानें आपल्या वडील भावाच्या कृतीचा निषेध केला. हा सर्व कृत्रिम प्रकार पाहून अनेकांना चीड आली. मदनलाल धिंग्राच्या निषेधाचा ठराव स्वतःच वाचून दाखवून तो सर्वसंमत असल्याचें घाईनें जाहीर करण्याची अध्यक्षाची कारवाई सभास्थानीं आपल्या समवयस्क मित्रांसह उपस्थित असलेल्या सावरकरांच्या प्रसंगावधानामुळें व धिटाईमुळें निष्फळ झाली. निषेधाच्या ठरावाच्या विरुद्धहि मतें नोंदवूं इच्छिणारे लोक सभेत आहेत असें सावरकरांनीं गंभीरपणें सांगण्याचा सपाटा चालविला; त्यामुळें सभेंत गोंधळ झाला व प्रकरण चांगलेंच हातघाईवर आलें. सावरकरांच्या डोळ्यालगत एक जखम झाली व त्या जखमेंतून रक्त वाहूं लागलें. सभा गोंधळात विसर्जन पावली. मदनलालजी धिंग्रा यांनीं केलेलें कृत्य व त्याचें स्वरूप या गोष्टी कोर्टांत चर्चिल्या जावयाच्या आहेत तोंच त्या गोष्टींचा निषेध करणें कायदेशीर दृष्टीनेहि कसें अप्रस्तुत आहे हें स्पष्ट करून सांगणारें एक पत्र सावरकरांनीं त्या रात्रींच लिहिलें व तें अनेक वृत्तपत्रांकडे प्रसिद्धीसाठीं रवाना केलें. हें पत्र प्रसिद्ध झाल्यामुळें धिंग्रा निषेधाची उसळलेली लाट बरीच ओसरली.

मदनलालजींना तुरुंगात ठेवल्यावर पहिले काही दिवस त्याच्या बरोबरीच्या तरुणापैकीं कोणालाच त्याची भेट घेता आली नाहीं. पुढें एक दोघा मित्रांना त्याना दररोज भेटता येऊं लागलें. भेटीला जाणाऱ्या तरुणांची पहारेकरी कसून झडती घेत असत, भेटींत होणारें भाषण सक्तीनें इंग्रजींतच करावें लागे व या भाषणाचे वेळीं पहारेकरी अगदीं जवळ उभे असत. मदनलालजींशीं हस्तादोलन करणें अगर त्यांना कांहीं खाण्यापिण्याचे पदार्थ पुरविणें याहि गोष्टी निषिद्ध ठरविण्यात आल्या होत्या. दि. ५–७ ला श्री. ग्यानचंद वर्मा हे मदनलालजींना तुरुंगांत भेटले तेव्हां मदनलालजींनीं खूप जोरजोरानें त्याच्याशीं वाद केला आणि भारतमातेसाठीं आपण आत्मबलिदान केलें, असें त्यांनीं अभिमानानें म्हटलें. भेटीसाठीं येणाऱ्या कोणा तरी इसमाबरोबर एक छानदार लहानसा आरसाहि पाठवून दे, आरसा नसल्यामुळें ड्रेस करताना मोठी पंचाईत होतें असेंहि मदनलालजी या भेटींत म्हणाले. अशा परिस्थितींतहि मदनलालजींचें मन किती निर्भय होतें व त्याच्या वृत्तींतला विनोद या अवस्थेंतहि किती जागृत होता, हें त्याच्या या उद्‌गारावरून स्पष्ट होत आहे.

दि. १०-७ ला वेस्ट मिन्स्टर पोलिस कोर्टांत मदनलालजींवरील खटल्याची प्राथमिक चौकशी झाली. सरकारतर्फेंचा साक्षीपुरावा चालू असतांना मदनलालजी कोर्टांत अगदीं शांतपणे बसले होते. आपल्या कृत्याचें वर्णन खून या शब्दानें केलें जात आहे, असें पाहून त्यानीं त्या शब्दाला एकदां हरकत घेतली. मदन मोहनसिंग या हिंदी विद्यार्थ्याची साक्ष कोर्टांत वाचून दाखविण्यात आली तेव्हा मदनलालजी उसळून म्हणाले : हा इसम देशद्रोही आहे. आपल्या खिशात असलेलें लेखी वक्तव्य पोलिसानीं दि. १ च्या रात्रीं हस्तगत केले तें या ठिकाणीं सादर केलें जाईल अशी मदनलालजींची अपेक्षा होती. तें वक्तव्य पोलिस दाबून टाकीत आहेत असें लक्षात येतांच, मदनलालजींनीं कोर्टांत तात्कालिक स्फूर्तीनें एक भाषणवजा वक्तव्य केलें. आपण केलेलें कृत्य न्याय्य आहे, इंग्लिश न्यायालयाचा आपल्यावर काडीचाहि अधिकार नाहीं, वगैरे मुद्दे मांडल्यावर मदनलालजींनीं या वक्तव्यात इंग्लिशांशीं सुरू झालेला आपला लढा समर्थनीय व देशप्रेममूलक असल्याचें ठासून सांगितलें. इंग्लिशाना लुटारू व खुनी हीं विशेषणें लावल्यावर

मदनलालजींनी या जबाबात एक महत्त्वाचा मुद्दा माडला. देशभक्त तरुणाना फांसावर लटकावणाऱ्या व त्याना हद्दपार करणाऱ्या इंग्रजाना त्यानीं दूषणें दिलीं. हिंदुस्थानांत नांदण्याचा इंग्रजाना काडीचाहि अधिकार नाहीं, भारतभूला मलिन करणाऱ्या इंग्रजाना मारणें हें सर्वांशीं समर्थनीय आहे असेंहि म्हणण्याला ते चुकले नाहींत. इंग्रजांनीं आपल्याला देहांताची शिक्षा द्यावीच; तिचा सूड उगविण्याला आपले देशबांधव चुकणार नाहींत असेंहि विधान मदनलालजींनीं या वक्तव्यात केलें. मदनलालजींचा हा जबाब त्याच दिवशीं संध्याकाळीं प्रसिद्ध झालेल्या वृत्तपत्रानीं इंग्लडभर व जगभर प्रसृत केला. या जबाबामुळें सर्वत्र प्रक्षोभ निर्माण झाला.

या प्राथमिक चौकशीनंतर वरिष्ठ कोर्टांत मदनलालजींवरील खटल्याचें काम दि. २३ जुलै रोजीं चालावयाचें होतें. त्याच्या आदल्या दिवशीं दुपारीं सावरकर ब्रिस्टन जेलमध्ये जाऊन मदनलालजींना भेटले. मी तुझ्या ' दर्शनासाठीं ' आलों आहे असें म्हणून सावरकरानीं मदनलालजींच्या हौतात्म्याचा गौरव केला. आपल्या अखेरच्या इच्छा सावरकर पार पाडतील असा मदनलालजींना विश्वास वाटत असल्यामुळें, या भेटीत त्यानीं या इच्छा कोणत्या आहेत याचें स्पष्टीकरण केलें. मदनलालजींच्या धाकट्या भावाने कॅक्स्टन हॉलमधील सभेंत आपल्या वडील भावाच्या कृत्याचा निषेध केला खरा; पण, त्याला मागाहून याबद्दल वाईट वाटलें. असें असलें तरी मदनलालजींचा या भावावरील राग टिकून राहिला होता. त्याचा किंवा कोणाहि अहिंदूचा स्पर्श आपल्या शवाला होऊ नये आणि आपली उत्तरक्रिया हिंदुधर्मांप्रमाणें व्हावी, अशी मदनलालजींची पहिली इच्छा होती. कोणा तरी ब्राह्मणाने आपल्या शवाला मंत्राग्नि द्यावा ही त्यांची दुसरी इच्छा होती. आपले कपडेलत्ते, सामानसुमान वगैरेंचा लिलाव करण्यात यावा व जे पैसे येतील ते लंडनमधील हिंदी लोकांनीं चालविलेल्या राष्ट्रीय निधीला देण्यात यावेत अशी मदनलालजींची शेवटची इच्छा होती. आपली भेट अतःपर होऊ शकणार नाहीं ही जाणीव सावरकर व मदनलालजी या उभयतानाहि असल्यामुळें, त्यांनीं परस्परांचा निरोप किती जड अंतःकरणानें घेतला असेल हें कोणालाहि समजण्यासारखें आहे.

दि. २३ जुलैला मदनलालजींवरील खटल्याचें काम वरिष्ठ कोर्टात सुरू झालें. विद्यार्थी व इतर मिळून शंभरावर हिंदी स्त्रीपुरुष कोर्टा बाहेर उभे होते. परंतु त्याच्यापैकीं कोणालाहि आत जाण्याची परवानगी देण्यात आली नाहीं. मदनलालजी आरोपीच्या पिंजऱ्यात येऊन उभे राहिले ते अगदीं धिटाईने व बेफिकीरपणानें ! आरोपपत्र वाचून दाखविण्यात आल्यावर ' आरोप मान्य कीं अमान्य ' असा प्रश्न कोर्टानें मदनलालजींना विचारला. तेव्हा मदनलालजी म्हणाले : या आरोपपत्रातले शब्द मला लागतच नाहींत मुळीं! मी केलें तें देशभक्तीपायीं केलें, अतएव तें समर्थनीय आहे. मला जें काहीं म्हणावयाचें आहे तें माझ्या वक्तव्यात म्हटलेले आहे. तुमच्यापाशीं ते वक्तव्य आहे असें मी समजतों. 'आरोप मान्य कीं अमान्य' या प्रश्नाचे नेमकें व मोजकें उत्तर द्या असें न्यायमूर्तींनीं मदनलालजींना म्हटल्यावर मदनलालजी म्हणाले : माझ्या मते मी निर्दोषी आहें. माझ्या वक्तव्यात माझें म्हणणें नमूद करण्यात आलें आहे.

या संभाषणानंतर न्यायमूर्तींनीं मदनलालजींना बसावयास सांगितलें. सरकारतर्फेची बाजू मांडण्यात आल्यावर मदनलालजी व न्यायमूर्ती यांच्यामध्यें फिरून कांहीं प्रश्नोत्तरें झालीं. सरकारतर्फेचा साक्षीपुरावा खरा असल्याचें मदनलालजींनीं मान्य केलें व आपण कर्झन वायलींना मारलें हेंहि त्यानीं कबूल केलें. आपलें वक्तव्य वाचून दाखविण्यात यावें अशी इच्छा मदनलालजींनीं व्यक्त केली. त्यामुळे न्यायमूर्तींना असे वाटले कीं, पोलिस कोर्टातला आपला जबाब वाचला जावा अशी आरोपीची इच्छा आहे. तो जबाब वाचून दाखविण्यात आल्यावर मदनलालजींनीं कोर्टाच्या निदर्शनास असें आणून दिलें कीं फूलस्कॅप कागदावर लिहिलेले आणखी एक वक्तव्य असून तें वाचलें जावें अशी आपली इच्छा आहे. तुम्ही स्वतः तें वक्तव्य करूं शकता असें कोर्टाने सांगितलें; पण, मदनलालजींना त्या वक्तव्यातला मजकूर आठवेना। खिशातल्या कागदाबरोबर तें वक्तव्यहि पोलिसांनीं हस्तगत केलें, असे मदनलालजींनीं म्हटलें. पण त्याचा काहीं उपयोग झाला नाहीं. ज्यूरीला उद्देशून आपल्याला काहींहि सांगावयाचें नाहीं, असें मदनलालजी म्हणाले.

आरोपी दोषी कीं निर्दोषी या प्रश्नाची चर्चा करून निश्चित मत बनविण्यासाठीं ज्यूरींतले सभ्य गृहस्थ बाजूच्या एका खोलींत जाऊन बसले. चर्चा

करण्यासारखें विशेष कांहीं वादग्रस्त नसल्यामुळें लौकरच ते कोर्टांतल्या आपल्या जागेवर येऊन बसले. आरोपी दोषी असल्याबद्दलचा आपला एकमुखी अभिप्राय त्यांनीं कोर्टाला कळविला. हा अभिप्राय कानीं पडताच मदनलालजी म्हणाले : या न्यायालयाचा अधिकार मी मानीत नाही हें मी वारंवार म्हटलेंच आहे. तुम्ही मला देहांताची शिक्षा देऊं शकता. मला त्या शिक्षेची कांहींच पर्वा वाटत नाहीं. आज तुम्ही सर्वश्रेष्ठ सत्ताधारी आहां; पण, एक काळ असाहि येईल कीं त्या वेळीं आम्ही सर्वश्रेष्ठ सत्ताधारी बनूं. आम्हाला हवें असेल तें त्यावेळीं आम्हीहि करूं. मदनलालजींचें हें भाषण पुरें होताच त्यांना देहांताची शिक्षा सागण्याच्या तयारीची खूण म्हणून न्यायमूर्तींनीं आपल्या डोक्यावर काळी टोपी चढविली. न्यायमूर्तींनीं शिक्षा सांगितल्यावर एक धर्माधिकारी पुढें आला व परमेश्वर तुला क्षमा करो, असा मंत्र त्यानें म्हटला. हा विधि संपल्याबरोबर मदनलालजी ताड्कन् पिंजऱ्यात उभे राहिले. न्यायमूर्तींचे प्रणामपूर्वक आभार मानल्यावर ते म्हणाले : मला मृत्यूची पर्वा वाटत नाहीं. माझ्या मायदेशासाठीं बलिदान करण्याचा मान मला मिळाला याबद्दल मला अभिमान वाटत आहे. इतकें बोलून मदनलालजी हंसतहंसत पिंजऱ्यातून बाहेर निघाले आणि बरोबरच्या तीन पहारेकऱ्यासह ते तुरुंगाकडे रवाना झाले.

मदनलालजींनीं खिशात बाळगिलेले वक्तव्य पोलिसानीं हस्तगत केलें, तें त्यानीं दाबून दडपून टाकलें, वरिष्ठ न्यायालयातहि तें वाचले गेले नाहीं व त्यामुळें तें जगापुढे येऊं शकलें नाहीं, ही गोष्ट मदनलालजींच्या मित्राच्या मनाला फार लागली. दि. १७ ऑगस्ट रोजीं सकाळीं मदनलालजींना फासावर लटकाविण्यात येणार ही गोष्ट या मित्राना माहीत असल्यामुळे, त्या दिवसापूर्वी ते वक्तव्य प्रसिद्ध करून मदनलालजींना समाधान कसे मिळवून द्यावे, या विचारात मदनलालजींचा मित्रपरिवार दंग झाला. या सुमारास सावरकराची प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळें ते २९ जुलै रोजीं लंडन सोडून ब्रायटनला जाऊन राहिले होते. येथे बसून विचार केल्यावर त्यानीं श्री. ग्यानचंद वर्मा याना ब्रायटनला बोलावून घेतलें. या वक्तव्याची मूळ हस्तलिखित प्रत सावरकराजवळ होती. ती त्यानीं वर्माजींच्या स्वाधीन केली. वर्माजींनीं पॅरिसला जावें व तेथें या पत्रकाच्या प्रती त्यानीं गुप्तपणें छापून

ध्याव्या आणि तेथूनच त्या अमेरिका, जर्मनी वगैरे देशातल्या वृत्तपत्रांकडे प्रसिद्धीसाठीं धाडाव्या असा बेत निश्चित ठरून त्याप्रमाणें वर्मा हे पॅरिसला निघून गेले. गुप्तपणें काम करण्याची वर्माजींची हातोटी श्रेष्ठ प्रकारची असल्यामुळें त्यांनीं अंगीकृत कार्य उत्तम प्रकारें पार पाडलें.

खुद्द इंग्लंडमध्येंहि हें वक्तव्य प्रसिद्ध व्हावें व शक्य तर तें वृत्तपत्रांतून प्रसिद्ध व्हावें अशी सावरकरप्रभृति मंडळींची मनःपूर्वक इच्छा होती. अनेक संधानें जुळवून, हजार हिकमती लढवून त्यांनीं ही इच्छा शेवटीं सफल करून दाखविली. 'डेली न्यूज' या दैनिकाच्या संपादकमंडळांत एक आयरिश गृहस्थ होते. त्याना वश करून घेण्याच्या कामीं या दीर्घोद्योगी मंडळींना यश आलें. दि. १५ ऑगस्टच्या रात्रपाळीला हे गृहस्थ कामावर होते. जुळणिसांच्या स्वाधीन करावयाच्या इतर मजकुराबरोबर या स्वारीनें हें वक्तव्यहि घुसडून दिलें व तें दि. १६ ला सकाळींच प्रसिद्ध होणाऱ्या डेली न्यूजच्या अंकात छापून टाकलें. हें वक्तव्य अशा प्रकारानें प्रसिद्ध झाल्यामुळें इंग्लंडच्या सरकारी अधिकाऱ्याना जबरदस्त धक्का बसला. इंग्लिश पोलिस खात्याला शरमेनें मान खालीं घालावी लागली; पण, देहांताच्या शिक्षेची अमलबजावणी होण्याच्या तब्बल एक दिवस अगोदर वक्तव्य प्रसिद्ध झाल्याचें समाधान मदनलालजींना लाभलें. इतक्या प्रयासानें प्रसिद्ध करण्यात आलेलें मदनलालजींचें हें वक्तव्य Challenge (आव्हान) या नावानें प्रसिद्ध आहे. देशाभिमानी हिंदी तरुणाना सरकारनें फासावर चढविलें व काळ्या पाण्यावर धाडलें, या गोष्टीचा सूड म्हणून आपण वायलीसाहिबाला मारलें अशी कबुली या वक्तव्याच्या आरंभीं देण्यात आली असून, या कृत्याची सर्व जबाबदारी माझ्या एकट्यावर आहे—यात कट वगैरे कांहीं नाहीं—असा खुलासा मदनलालजींकडून करण्यात आला आहे. परकी शस्त्रास्त्रांच्या मदतीनें दास्यांत जखडून टाकण्यांत आलेलें राष्ट्र हें निरंतर युध्यमान राष्ट्रच असतें असा सिद्धांत माडून मदनलालजींनीं पुढें असें म्हटलें आहे कीं, प्राप्त परिस्थितीमुळें शत्रूंशीं रणांगणावर सामना देणें शक्य नसल्यामुळें मला पिस्तुलाचा उपयोग करावा लागला आहे. मायदेशाचा अपमान व परमेश्वराचा अपमान यांत आपण

फरक मानीत नाहीं असें सांगून मदनलालजींनी या पत्रकात देशकार्यार्थ होणाऱ्या आत्मबलिदानाचें स्वरूप किती उदात्त असतें हें स्पष्ट केलें आहे.

१७ आगष्ट १९०९ या दिवशीं प्रभातकाळींच पेन्टेन्व्हिली तुरुंगात मोठी गडबड उडालेली दिसत होती. आदल्या रात्रीं लागलेल्या गाढ झोंपेंतून जागे झालेले मदनलालजी उत्तम प्रकारचा पोषाख करून आपल्या परलोकच्या प्रवासासाठीं सिद्ध झाले होते. मदनलालजींचे अनेक देशबांधव दुःखित अंतःकरणाने तुरुंगाच्या बाहेर घोटाळत होते व त्याचें मन मदनलालजींच्या अंत्यदर्शनासाठीं उत्सुक बनून तुरुंगात घिरट्या घालीत होतें. मदनलालजींच्या अलौकिक वर्तनामुळें ज्याच्या मनांत त्याच्याविषयीं आदरभाव निर्माण झाला होता असे दोनतीनशें इंग्रजहि आतुरतेने तुरुंगाबाहेर जमले होते. तुरुंगातल्या नित्यक्रमाप्रमाणें सर्व कैद्याना सकाळची न्याहारी देण्यात आली. नेहमींच्या रिवाजाप्रमाणें मदनलालजींनीं शांतपणाने न्याहारी घेतली. घड्याळात नऊ वाजले आणि तुरुंगातली घंटा घण्घण् वाजूं लागली. ख्रिस्ती धर्माचा एक उपदेशक मदनलालजींजवळ आला व तो त्याच्यापाशीं काहीं बोलूं लागला. पण, मदनलालजींचा हिंदुत्वाभिमान प्रखर असल्यामुळे त्यानीं त्या उपदेशकाच्या तोंडचा शब्दहि ऐकण्यास नकार दिला. मदनलालजी वधस्तंभाकडे चालूं लागले ! त्यांचा उघडा उन्नत शीर्षभाग त्याच्या उदार मनाची साक्ष देत आहे, खंबीरपणानें पडणारीं त्याचीं पावलें त्याच्या अचल चित्तवृत्तीची ग्वाही देत आहेत असें त्यांच्याकडे बघणाऱ्या लोकाना वाटलें. कसल्याहि आधाराची अपेक्षा न धरता ते तत्परतेनें वधस्तंभावर चढूनहि गेले. त्याचा गळा पाशात गुंतला ! ठोकळा उडाला ! मृत्यूच्या दारातून मदनलालजी मुक्तीच्या साम्राज्यात प्रविष्टहि झाले !!

इंग्रजानीं मदनलालजी धिंग्रा याना फांसावर चढविलें आणि मदनलालजी अत्यंत धीरोदात्तपणानें फांसावर चढले हें सगळें खरें; पण, या प्रकरणात इंग्लंडची जगाच्या चव्हाट्यावर चांगलीच छीः थू झाली. अमेरिका, आयर्लंड, इटली वगैरे देशांतल्या वृत्तपत्रानीं या प्रकरणाचा फायदा घेऊन इंग्लडच्या साम्राज्यतृष्णेवर चांगलेच तडाखे उडविले ! भारतमाता मदनलालजींसारख्या पांचशें सुपुत्रांना जन्म देऊं शकली तर तिचें विमोचन सिद्ध झालेंच पाहिजे असे गौरवपर उद्गार काढून, ब्लंट नांवाच्या एका इंग्रज लेखकानें

त्या हुतात्म्याच्या थोरवीला स्मृतिसुमनें वाहिलीं. खिस्ती जगांत धर्मकारणासाठीं प्राणार्पण करणारे हुतात्मे होऊन गेले; रजपुताचा इतिहास, शीखांचा इतिहास, मराठ्याचा इतिहास या सर्व इतिहासाना हुतात्म्यांच्या त्यागानें गौरविले आहे. मदनलालजींचें हौतात्म्य इतके उदात्त स्वरूपाचें आहे कीं जगातल्या कोण-त्याहि श्रेष्ठ हुतात्म्याच्या परिगणनेंत त्यांना श्रेष्ठ स्थान मिळालेंच पाहिजे. त्याच्या वर्तनाचें कसेहि व कितीहि परीक्षण केलें तर त्यांत कोठेंहि कचेपणा, भीरुपणा, हीनपणा, अहंपणा यातलें काहींहि आढळावयाचें नाहीं. दि. १ जुलै १९०९ च्या रात्रीं मदनलालजींना अटक झाली व दि. १७ ऑगस्टला सकाळीं त्याना फासावर चढविण्यात आले. या काळात त्यांना जेव्हां जेव्हा त्याच्या शत्रूपुढें उभें रहावें लागलें तेव्हा तेव्हा त्याचें वर्तन असें धीरोदात्तपणाचे होतें, कीं तें पाहून त्याच्या समर्थ शत्रूला आपल्या सामर्थ्याचा किळस वाटूं लागावा! धिंग्राजींनीं इहलोक सोडला त्या दिवशीं इंग्लंडमधल्या सर्व हिंदी विद्यार्थ्यांनीं कडकडीत उपोषण करून या हुतात्म्याबद्दलचा आदरभाव व्यक्त केला. मदन-लालजींसारखे हुतात्मे हेच खरे राष्ट्रजनक होत अशा भावनेने श्री. ग्यानचद वर्मा यानीं त्याच्या मृत्यूच्या दहाव्या दिवशीं क्षौर करून त्याचें श्राद्ध केलें !

× × ×

भारतातलें ब्रिटिश साम्राज्य आता अस्ताला जाऊं पहात आहे. ते पुरें अस्ताला जाईल व पेशावरपासून रामेश्वरापर्यंत आणि चितागांगपासून कराची-पर्यंत पसरलेला आपला हा प्राचीन भारतवर्ष एकसंध व समर्थ होईल हीहि गोष्ट निर्विवाद खरी आहे. ती गोष्ट सिद्ध होईल त्या वेळीं जे मुत्सद्दी सत्तारूढ असतील त्यांना भारताच्या स्वातंत्र्यसंग्रामाची परंपरा पुरतेपणीं अवगत असेल तर लंडनमधील पेंटेनव्हिली तुरुंगांत हुतात्मा मदनलालजींचें स्मारक उभारण्याला ते चुकणार नाहींत. हें साध्य आजचें नव्हे; भविष्यकाळचें आहे! पण आजहि एक गोष्ट घडवून आणणें आजच्या हिंदी सत्ताधाऱ्याना शक्य आहे. मुंबई, पुणें, नागपूर, मद्रास, पाटणा, दिल्ली, लखनौ वगैरे मोठ्या शहरांतून एकाद्या ठळक अशा सार्वजनिक जागीं मदनलालजींचे भव्य पुतळे उभारणें प्रांतोप्रांतींच्या सत्ताधाऱ्यांना आजहि शक्य आहे. असे पुतळे

उभारले गेले तर लाला हरदयाळ यांनी व्यक्त केलेली एक सद्भावना प्रत्यक्षात उतरेल; कारण, अशा पुतळ्यांकडे पाहणारीं उद्यांचीं भारतीय बालकें म्हणतील : आपल्या प्रिय कार्यासाठीं दूरच्या एका देशात प्राणाची आहुति देणारे महाभाग मदनलालजी धिंग्रा ते हेच! मदनलालजीच्या हौतात्म्याचें स्मरण उद्याच्या बालकाच्या मनांत ठसून राहणें व त्या विभूतीपुढे आपला माथा नमविण्याची संधि उद्यांच्या बालबालिकाना मिळणे हें राष्ट्रातल्या जीवंतपणाची परंपरा टिकण्याच्या दृष्टीनें अत्यंत अवश्य आहे.

---

# ३. ऋषीजी अय्यर

लंडन येथील वास्तव्यांत सावरकर याना दक्षिण भारतातीलहि अनेक सहकारी लाभले. केरळ प्रान्तातील गोविंद मेनन, दक्षिण आफ्रिकेंतून नुकतेच स्वदेशीं परत येऊन गेलेले बॅरिस्टर पाथर अर्थात् रत्नभू, सध्यां कॉंग्रेस पक्षात वावरत असलेले मद्रासी नेते डॉ. राजन्, सध्या मुंबई येथें रहात असलेले श्री. एम. पी. टी. आचार्य ही सर्व दक्षिण भारतांतील मंडळी सावरकर लंडनमध्यें होते त्या वेळीं त्यांच्या प्रभावळींत नादत होती. या सर्व मंडळींना सावरकरांच्या प्रभावळींत महत्त्व होतें हें खरें असलें तरी, श्री. व्ही. व्ही. अस्. अय्यर या गृहस्थाचें सावरकराच्या प्रभावळींतील स्थान विशेष महत्त्वाचें होतें. रौलेट कमिटी रिपोर्टमध्यें 'सावरकराचे उजवे हात' या शब्दप्रयोगानें श्री. अय्यर यांना गौरविण्यांत आलेलें आहे, ही गोष्टच त्यांच्या महत्त्वाची ओळख पटवून देण्याच्या दृष्टीनें पुरेशी आहे.

श्री. अय्यर याचे वडील मद्रास प्रांतांतील त्रिचनापल्ली [ त्रिशिरपुरम् ] या विख्यात नगरानजीक कावेरी नदीच्या कांठीं असलेल्या वराकनेरी या गावीं जन्मले व वाढले. त्रिचनापल्ली येथील सेंट जोसेफ कॉलेजमध्यें कांहीं शिक्षण घेतल्यावर ते सरकारी शाळातपासनीस म्हणून काम पाहूं लागले. हे गृहस्थ कडक सनातनी ब्राह्मण होते. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें त्यांचें लग्न बालवयातच झालेलें होतें. त्यांच्या पत्नीचें नांव कामाक्षी असें होतें. या बाईच्या पोटीं २–४–१८८१ रोजीं जें पुत्ररत्न जन्मास आलें तेंच पुढें व्ही. व्ही. अस. अय्यर अर्थात् ऋषीजी या नांवानें प्रसिद्धि पावलें. मद्रास प्रान्तांतील अरोड शहरानजीक चिन्नलंपट्टी म्हणून गांव आहे तें कामाक्षी बाईच्या माहेरचें गांव. या आजोळच्या गांवीं श्री. अय्यर यांचा जन्म झाला.

बालवयांत वेंकट सुब्रह्मण्यमूला निर्सगाची शोभा अवलोकन करण्याचा व निसर्गाचे चमत्कार पाहण्यांत रंगून जाण्याचा छंद होता. श्रीराम आणि अर्जुन या भारतीय वीरांच्या कथा ऐकतांना या बालकाची वृत्ति तल्लीन होव असे. वेंकट सुब्रह्मण्यं मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाला त्या वेळीं त्याचें

वय अवघें बारा वर्षांचें होतें. या परीक्षेत उत्तीर्ण झालेल्या त्या वर्षीच्या सर्व विद्यार्थ्यांमध्यें या मुलानें पांचवा क्रमांक पटकविला होता. वाङ्मय, इतिहास, अर्थशास्त्र, इत्यादि विषय ऐच्छिक विषय म्हणून निवडून, श्री. अय्यर यांनीं मद्रास विद्यापीठाची बी. ए. ची परीक्षा १८९९ सालीं दिली; आणि, या परीक्षेत लॅटिन भाषा या विषयात त्यांना पहिल्या वर्गात स्थान मिळालें. पुढें कायद्याचा अभ्यास करून त्यांनीं १९०१ सालीं त्रिचनापल्ली येथें वकिली थाटली. श्री. अय्यर हे बी. ए. च्या वर्गात शिकत होते तेव्हा त्यांचें लग्न झालें. त्यांच्या पत्नीचें नांव भाग्यलक्ष्मी असें होतें. सुमारें चार वर्षे त्रिचनापल्ली येथें वकिली केल्यावर, श्री. अय्यर हे सहकुटुंब रंगूनला गेले. पशुपति अय्यर नांवाचे त्यांचे एक नजीकचे आप्त कापडाच्या व्यापारांत शिरले होते आणि बंगलोर, पाँदिचरी, रंगून अशा अनेक ठिकाणीं त्यांनीं दुकानें थाटलीं होतीं. त्यांच्या आग्रहामुळे व प्रोत्साहनामुळे श्री. वेंकट सुब्रह्मण्यं अय्यर हे रंगून येथें जावयाला तयार झाले.

रंगून येथें वकिली करीत असताना त्यांना इंग्लिश बॅरिस्टरांचा जो अनुभव आला तो मोठासा चांगला नव्हता. केवळ इंग्रज म्हणून आणि इंग्लंडमधून तयार होऊन आलेले बॅरिस्टर म्हणून हे लोक श्रेष्ठ मानले जातात आणि त्यामुळेंच त्यांच्या वागण्यात बेपर्वाई व उद्दामपणा दिसूं लागतो, असा श्री. अय्यर यांचा ग्रह झाला. या इंग्रज बॅरिस्टरांच्या बरोबरीनें वागावयाचें तर आपणहि इंग्लंडला गेलें पाहिजे व बॅरिस्टर होऊन आलें पाहिजे, असें श्री. अय्यर यांना वाटूं लागलें. १९०७ सालीं ऑक्टोबर महिन्याच्या शेवटीं श्री. अय्यर हे इंग्लंडला जावयाला निघाले. त्या सुमारास त्यांना एक मुलगी झालेली होती.

इंग्लंडमध्यें पोंचल्यावर श्री. अय्यर यांनीं बॅरिस्टरीचा अभ्यास सुरू केला. इंग्लंडमधील झोंकदार रहाणी आणि इंग्लिश जीवनांत मुरून गेलेला जडवाद यांच्या मोहनीमुळें त्यांनीं युरोपियन नृत्य–गायनहि आत्मसात् करण्याचा प्रयत्न चालविला, असेंहि म्हणण्याला हरकत नाहीं. इंग्लंडमध्यें गेल्यावर सुमारें दोन महिन्यांनीं श्री. अय्यर हे इंडिया हाऊसमध्यें गेले. सावरकरांशीं त्यांचा परिचय वाढूं लागला त्याबरोबर त्यांच्या वृत्तींतहि पालट पडला आणि बालपणीं ज्या संस्कारांचें बीज त्यांच्या मनोभूमींत रुजलें होतें तें वाढीस लागून,

श्री. अय्यर यांच्या वृत्तींत स्वदेश व स्वधर्म यांचा अभिमान संचरूं लागला. लवकरच ते इंडिया हाऊसमध्यें राहूं लागले व सावरकरांच्या सगळ्या उद्योगांत मनोभावानें भाग घेऊं लागले.

सावरकर म्हणजे एक आग्यावेताळ ( fire-brand ) आहेत अशी त्यांची सावरकरांबद्दलची पहिली भावना होती. सावरकरांना भेटण्यालाहि जे प्रथम फारसे उत्सुक नव्हते तेच अय्यर सावरकरांशीं परिचय झाल्यानंतर पार बदलून गेले. नृत्यगायनादि रंजक कार्यक्रमात वेळ घालविण्याची सध्यांची परिस्थिति नाहीं, तरुणांची कार्यशक्ति आतां अधिक महत्त्वाच्या उद्योगांत गुंतली पाहिजे हे सावरकरांच्या तोंडून पहिल्याच भेटींत निघालेले उद्‌गार अय्यर याना विचारमार्गाला लावण्याला उपयोगी पडले. Are We Obliged to British Rule? (ब्रिटिश राज्यपद्धतीनें आपल्यावर कांहीं उपकार केले आहेत काय?) या विषयावर सावरकरांनीं एका साप्ताहिक बैठकींत दिलेलें व्याख्यान ऐकल्यावर अय्यर यांच्या वृत्तींत संपूर्ण मतपरिवर्तन झालें. एकीकडे बॅरिस्टरीचा अभ्यास करीत असतानाच ते सावरकरांच्या सर्व उद्योगात सहकार्य करूं लागले. खाजगी पत्रव्यवहाराच्या साहाय्यानें मद्रास प्रांतात राहणाऱ्या आपल्या मित्रांना क्रांतिवादाची दीक्षा देण्याचें व त्या काळीं मद्रास प्रांतात प्रसिद्ध होत असलेल्या 'इंडिया' नांवाच्या साप्ताहिकांत बातमीपत्रें लिहून त्या प्रांतांतल्या लोकमताला वळण लावण्याचें काम अय्यर यांनीं सुरू केलें.

१९०८ सालीं मे महिन्याच्या आरंभीं लंडन येथें फ्री इंडिया सोसायटीतर्फे श्रीशिवोत्सव साजरा करण्यांत आला. सावरकर हे या उत्सवसमारंभाचे अध्यक्ष होते व श्री. अय्यर यांनीं या प्रसंगीं श्रीशिवाजीमहाराजांच्या चरित्रावर फार सुंदर व्याख्यान दिलें. १० मे रोजीं इंडिया हाऊसमध्यें १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाचा वाढदिवस साजरा झाला त्या प्रसंगीं अय्यर यांच्याकडे राष्ट्रीय प्रार्थना म्हणण्याचें काम होतें. या गाजलेल्या समारंभानंतर सावरकरांनीं तपस्यामास पाळण्याचें ठरविलें. मोठमोठ्या मंडळींना भेटून निधि जमविणें व त्याना १८५७च्या समर प्रसंगाचें सत्यस्वरूप पटवून देणें हें काम करण्यासाठीं जी मंडळी नियुक्त झाली होती त्यांत खुद्द सावरकरांबरोबर

अय्यरहि होते. रमेशचंद्र दत्त, ना. गोखले प्रभृति ज्येष्ठ मुत्सद्यांना सावरकर भेटले त्या वेळीं अय्यर त्यांच्या समवेत होते.

सावरकरांनीं सुरू केलेल्या सभा-समारंभ, बैठकी-चर्चा वगैरे कार्यक्रमांतून अय्यर हे प्रामुख्यानें भाग घेतच असत; पण, सावरकरांच्या गुप्त उद्योगांत ज्यांचें विशेष अंग असे अशा निवडक मंडळींतहि अय्यर यांची लौकरच प्रामुख्यानें गणना होऊं लागली. १० मे १९०८ रोजीं झालेल्या समारंभात 'हे हुतात्म्यानो' या शीर्षकाचीं इंग्रजी पत्रकें वाटण्यांत आलीं होतीं. तीं पत्रकें बेमालूमपणें हिंदुस्थानात पाठविण्याच्या कामात व पुढें सावरकरांनीं बॉंब फॉर्म्युल्याचें छोटें पुस्तक सायक्लोस्टाइलवर छापून घेऊन त्याच्या शेंकडों प्रती हिंदुस्थानात धाडून दिल्या त्याहि कामात अय्यर यांनीं टळकपणें भाग घेतला होता. पॅरिसहून आणलेलीं ब्राउनिंग रिव्हॉल्व्हर्स सावरकरांनीं १९०९ च्या जानेवारी महिन्यांत चतुर्भुज नावाच्या इसमाबरोबर हिंदुस्थानात धाडून दिलीं. या रिव्हॉल्व्हर्ससाठीं चोर-कप्याची स्वतंत्र पेटी बनविण्याचे व त्या पेटींत तीं रिव्हॉल्व्हर्स व्यवस्थित रीतीनें भरण्याचे काम सावरकरांनीं अय्यर यांच्याच मदतीनें केलें.

सावरकरांनीं निर्माण केलेल्या संघटनेंत अय्यर यांचें स्थान किती श्रेष्ठ दर्जाचें होतें हें १९०९ मध्यें घडून आलेल्या कीर्तिकर–प्रकरणावरूनहि स्पष्ट होत आहे. सहा भिन्नभिन्न भाषा जाणणारे कीर्तिकर नावाचे एक गृहस्थ मुंबई हायकोर्टमध्यें सरकारी भाषांतरकाराचें काम करीत असत. आपलाच कोणी तरी माणूस इंडिया हाऊसमध्यें घुसलेला असला तर हिंदी क्रांतिकारकांच्या बेतांची बित्तंबातमी आपल्याला सहज समजू शकेल असा विचार सरकारी अधिकाऱ्यांच्या मनांत रुजल्याबरोबर, या कामावर सरकारनें कीर्तिकर यांची योजना केली. दंतवैद्यक शिकण्याचें निमित्त निर्माण करून हे गृहस्थ इंग्लंडला गेले व महाराष्ट्रीय या नात्यानें सावरकरांशीं संधान बांधीतबांधीत ते इंडिया हाऊसमध्यें घुसले. बाह्यतः ते या ठिकाणच्या जीवनाशीं तन्मय झालेले दिसत; पण, त्यांच्या एकंदर वर्तनात जें शैथिल्य होतें तें अय्यर यांच्या बारीक नजरेंतून निसटूं शकलें नाहीं. अपरात्रीं बाहेर भटकत राहण्याची कीर्तिकर यांना सवय आहे, तिचा आपण फायदा घ्यावा असें ठरवून, अय्यर यांनीं एकदां रात्रीच्या वेळीं कीर्तिकरांच्या खोलीचें कुलूप काढलें. इंडिया हाऊस-

मधील घडामोडींचा अत्यंत विपर्यस्त अहवाल ज्यांत लिहून ठेवलेला आहे असे कित्येक कागद अय्यर यांच्या हातीं आले. त्यानीं ते कागद सावरकरांच्या स्वाधीन केले. दुसऱ्या दिवशीं मध्यरात्रींच्या सुमारास कीर्तिकर खोलींत येऊन झोंपल्यावर अय्यर यानीं त्यांच्या खोलीचें दार ठोठावण्याला सुरुवात केली. कीर्तिकरांनीं दार उघडल्यावर सावरकर नि अय्यर दोघेहि खोलींत शिरले. आपल्यावर भलताच आळ उगीचच घेण्यांत येत आहे असा कीर्तिकरांनीं बहाणा केला; पण, बरोबर आणलेलें भरलेलें पिस्तुल अय्यर यांनीं रोंखून धरतांच आणि आदल्या रात्रीं खोलींत सापडलेले कागद सावरकरांनीं समोर ठेवतांच, कीर्तिकर गर्भगळित झाले नि गयावया करूं लागले. तावडींत सांपडलेल्या कीर्तिकरांना सुखासुखी सोडून द्यावयाचें नाहीं, त्यांना इंडिया हाऊसमध्यें आपल्या नजरकैदेंत ठेवून राबवून घ्यावयाचें, असा जो विचार पुढें ठरला त्यालाहि अय्यर हे पुष्कळ अंशीं कारणीभूत होते.

प्रत्येक महत्त्वाच्या मसलतींत अय्यर हे सावरकरांबरोबर असत; त्याप्रमाणेंच सावरकरांवरील प्रत्येक महत्त्वाच्या प्रसंगातहि ते त्यांच्या सन्निध मदतनीस म्हणून तयार असत. मदनलालजी धिंग्रा यांनीं कर्झन वायली यांचा वध केल्यानंतर, दि. ५--७--०९ रोजीं सायंकाळीं लंडन येथील कॅक्स्टन हॉलमध्यें जी शोकसभा झाली तिला सावरकर हे अय्यरप्रभृति मित्रमंडळीसमवेत उपस्थित होते. धिंग्राजींच्या निषेधाचा ठराव घाईघाईनें सभेपुढें मांडून सभाध्यक्षांनीं तो सर्वसंमत असल्याचें जाहीर केलें. त्याबरोबर सावरकरांनीं आपल्या जागेवरून "सर्वसंमत नाहीं; मी विरुद्ध आहें" असें ओरडून सांगितलें. यानंतर सभेंत खूप गोंधळ झाला व पामर नांवाच्या इंग्रजानें केलेला प्रहार सावरकरांच्या डोळ्यालगत लागून सावरकर जखमी झाले. हें पाहतांच अय्यर यांनीं खिशांतलें भरलेलें पिस्तुल बाहेर काढलें होतें व तें पामरवर झाडण्याला ते अगदीं सिद्ध झाले होते. इतक्यांत स्वतः सावरकरांनीं अय्यर यांना डोळ्यांनीं दाबलें व त्यामुळें अय्यर हे आपल्या साहसापासून परावृत्त झाले.

सावरकर यांनीं लिहिलेल्या मराठी पुस्तकाचें भाषांतर होऊन The Indian War of Independence हें पुस्तक तयार झाल्यावर व अनेक अडचणींतून पार पडून व अनंत हिकमती लढवून हें इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध

झाल्यावर त्याच्या प्रती हिंदुस्थानभर गुप्तपणें कशा प्रसृत करावयाच्या असा प्रश्न उपस्थित झाला. सरकारी अधिकाऱ्यांची दिशाभूल करण्यासाठीं पुस्तकावर वेगळ्याच इंग्रजी पुस्तकाच्या नांवाचे पुष्ठे चढविण्याचा जो उद्योग करण्यांत आला व हिंदुस्थानांत भिन्न भिन्न प्रातातून शेंकडों प्रती फैलावण्याच्या कामीं जें यश संपादण्यात आलें त्यांत अय्यर यांचा वांटा उपेक्षणीय नाहीं. पॅरिसमार्गें पांदिचरी व तिनेवेली येथें प्रती धाडण्याचें काम तर मुख्यतः अय्यर यांनींच केलें.

मदनलाल धिंग्रा यानीं केलेला कर्झन वायलीचा वध व त्याचें पर्यवसान म्हणून मदनलालजींना झालेली देहांताची शिक्षा या घटनांचा परिणाम असा झाला कीं, लंडनमधील हिंदी तरुण विस्काळित नि विघटित झाले. त्यांना एकत्र आणण्याच्या दृष्टीनें सावरकरांनीं विजयादशमीचा समारंभ लंडनमध्यें साजरा करण्याचें ठरविलें. या प्रसंगीं बॅ. गांधी यांना अध्यक्ष म्हणून पाचारण्याचे कामीं अय्यर हे प्रमुख होते. समारंभाच्या दिवशीं बराच वेळ पावेतों गांधीजी या क्रांतिकारक मंडळींच्या सहवासांत होते. सर्वांशीं समरस होऊन, आपला मोठेपणा विसरून, हवें तें हलकें काम आनंदानें करण्याची मोठ्या माणसाची तयारी असली म्हणजे त्याच्या वर्तनाची छाप भोंवतालच्या हिंदु माणसांवर किती झपाट्यानें पडते हें या प्रसंगीं स्पष्ट झालें. निर्भेळ अहिंसावादावर अय्यर यांनीं जन्मांत कधींच विश्वास ठेवला नाहीं. झोंपतांना उशाशीं तलवार ठेवणारे आणि सावरकरांच्या Indian War of Independence या ग्रंथाची आपल्या जवळची प्रत सुरक्षित आहे अशी खात्री करून घेऊन मगच निजणारे अय्यर गांधीवादी बनणें शक्यच नव्हतें. हें खरें असलें तरी, या विजयादशमीच्या समारंभानिमित्त गांधीजींशीं त्यांचा जो परिचय झाला व गांधीजींविषयीं त्यांचा जो अनुकूल अभिप्राय बनला त्यामुळें १९२० च्या पुढील काळांत अय्यर हे कांहीं दिवस असहकारवादी बनले, हें मात्र खरें आहे.

१९०९ च्या शेवटीं सावरकर न्युमोनियानें आजारी पडले. डॉ. मुथू यांच्या वेल्समधील रुग्णालयांत राहिल्यावर त्यांना बरें वाटूं लागलें. पण, बरें वाटल्यावर त्यांनीं इंग्लंडच्या थंडींत राहूं नये असा डॉक्टरांचा अभिप्राय पडला. त्यामुळें १९१० च्या जानेवारीच्या शेवटीं शेवटीं सावरकर फ्रान्सला

निघून गेले. सावरकरांच्या इंग्लंडमधील गैरहजिरींत हिंदी क्रांतिकारक पक्षांतल्या तरुणांना इंग्लंडमध्यें संघटित व कार्यनिष्ठ राखण्याची जबाबदारी अय्यर यांच्यावर येऊन पडली. हिंदुस्थान सरकारनें नाशिकचा कलेक्टर जॅक्सन याच्या वधाचे निमित्त साधून नाशिक-कटाच्या खटल्याची उभारणी केली व खुद्द सावरकर यांनाच सरकार अटक करणार व जास्तींत जास्त कडक शिक्षा ठोठावणार, असा संभव दिसूं लागला. या परिस्थितीमुळें लंडनमधील हिंदी तरुणांमधली बेदिली व फुटीर वृत्ति वाढूच लागली. स्वतः सावरकर जाग्यावर येऊन बसल्याविना या प्रकाराला पायबंद बसणार नाहीं अशी अय्यर यांची बालंबाल खात्री झाली व तशा आशयाचीं पत्रें ते सावरकरांना एकापाठोपाठ एक अशा पद्धतीनें पाठवूं लागले.

पॅरिसमध्ये सावरकरांना हीं पत्रें मिळूं लागलीं त्याबरोबर ते मनानें फार अस्वस्थ झाले. नाशिककटाच्या खटल्यातील धरपकड हिंदुस्थानांत सुरू झाली होती व सावरकर इंग्लंडात गेले तर ते तत्काळ पकडले जातील असा दृढ संभव उत्पन्न झालेला होता. सावरकरांनीं फ्रान्स सोडूं नये असें मादाम कामा, पंडितजी वगैरे मित्रमंडळी त्यांना बजावीत होती. सावरकरांचें मन द्विधा झालें होतें. इतक्यात त्यांना अय्यर अर्थात् ऋषीजी याची एक तांतडीची तार आली. ही तार येतांच सावरकरांनीं निर्धार केला. शामजी वगैरे मित्रमंडळींचें ऐकावयाचें नाहीं, नेता म्हणून आपल्यावर जी जबाबदारी आहे ती अंगावर घेण्यासाठीं इंग्लंडात जावयाचें, मग त्या गोष्टीचे परिणाम कांहींहि होवोत असें त्यांनीं ठरविलें. सावरकर दि. १३-३-१९१० ला इंग्लंडांत पोंचले व स्टेशनवरच पकडले गेले. समोर संकट दिसत असतांना सावरकर इंग्लंडात का गेले या प्रश्नाची भवति न भवति सुरू झाली. हिंदी नेत्यांना बदनाम करण्यात पुरुषार्थ मानणाऱ्या पोलिसखात्यानें एक गटारगप्प पसरवून दिली. सावरकराच्या एका प्रेयसीच्या नांवानें आम्हीं त्यांना तार धाडली व सावरकरांना आम्हीं बनविलें अशी प्रौढी पोलिसखातें मारूं लागलें. कांहीं भोळे व कांहीं मत्सरी असे लोक पोलिसांच्या या कुटिल प्रचारावर विश्वासहि ठेवूं लागले. सावरकरांकडे तार गेली होती हें खरें; पण ती तार दुसऱ्या कोणाचीहि नसून अय्यर या त्यांच्या श्रेष्ठ सहकाऱ्याची होती.

सावरकरांना पकडण्यांत आलें व शेवटीं त्यांना 'मोरिया' बोटीवर चढवून हिंदुस्थानकडे रवाना करण्यांत आलें. याच्या दरम्यान जो तीनसाडेतीन महिन्यांचा काळ लोटला त्यांत अय्यर यांनीं अनेक प्रकारची कामगिरी केली. सावरकरांची तुरुंगांत मधूनमधून भेट घेणें, त्यांना लागणारा कपडालत्ता पुरविणें, भेटींत त्यांचें मनोगत समजून घेणें व त्यांनीं सुचविलेल्या व सांगितलेल्या गोष्टी अंमलांत आणणें, त्यांच्या बचावाची व्यवस्था करणें, वगैरे सर्व खटपटींत अय्यर यांचें अंग प्रमुखत्वानें होतें. या अवधींत सावरकराना तुरुंगांतून काढून पळवून नेण्याचे जे दोनतीन प्रयत्न झाले त्यांतहि अय्यर यांनीं अव्वलपासून अखेरपर्यंत भाग घेतला होता. आपले धाकटे बंधु, आपली पत्नी इत्यादि कुटुंबीय मंडळींबद्दल कांहीं व्यवस्था करावयाचा विचार सावरकरांच्या मनात आला तर त्यासंबंधींच्या सूचनाहि ते अय्यर यांनाच करीत असत.

शेवटीं दि. १-७-१० ला सावरकराची मोरिया बोटींतून रवानगी करण्यांत आली. त्याआधींच पूर्वसंकेतानुसार अय्यर हे इंग्लंडला रामराम ठोकून निघाले होते. ते इंग्लंडांतून ज्या पद्धतीनें व शिताफीनें निसटले ती पाहिली म्हणजे या गृहस्थाच्या अंगीं असलेला हिकमतीपणा, हजरजबाबीपणा, प्रसंगावधान वगैरे गुणांचें कौतुक करावेंसें वाटतें. अय्यर यांच्या मागेंहि गुप्त पोलिसाचा ससेमिरा होताच. ते फ्रान्सला जाणार असल्याची बातमी गुप्तपोलिसखात्याला समजली होती. फ्रान्सला जाण्यासाठीं म्हणून अय्यर हे आगगाडीनें डोव्हर येथें येतील व तेथें आपण त्याना पकडूं, असा पोलिसांचा बेत होता. पण, गाडी चुकल्यामुळें अय्यर यांना वेगळ्याच मार्गानें डोव्हरचा बंदर-किनारा गाठावा लागला. अय्यर यांच्या हातांत जी ट्रंक होती तिच्यावर V. V. S. हीं इंग्रजी अक्षरें होतीं. बंदर किनाऱ्यावर टेहळणी करीत राहिलेल्या एक इंग्रज हेरानें अय्यर यांना जाळ्यांत अडकविण्याचा प्रयत्न केला. 'मि. अय्यर, ही घ्या आपली तार!' असें म्हणून तो अय्यर यांच्यापुढें उभा राहिला; पण अय्यर पक्के होते. ते म्हणाले, 'मी अय्यर नाहीं; माझें नाव आहे व्हीं. विक्रम सिंग!' असें म्हणून त्यांनीं ट्रंकवर कोरलेल्या आद्याक्षरांकडे अंगुलिनिर्देश केला. पोलिसला या उत्तरानें चकवून अय्यर तेथून निसटले.

ॲम्स्टरडॅमला जाणारी बोट बंदरात अगदीं तयार होती. तिचें तिकिट काढून ते झटकन् बोटीवर चढले व ॲम्स्टरडॅमहून तत्काळ पॅरिसला गेले.

पॅरिसला पोंचतांच त्यांनीं कामाबाई, हरदयाळ, शामजी, राणा वगैरे मित्रमंडळींची भेट घेतली. बोटीचा प्रवास चालू असतांना, बरीशी संधि दिसली तर सावरकर बोटींतून निसटण्याचा साहसी प्रयत्न नक्की करतील हें सावरकरांचें मनोगत त्यांनीं या मंडळींना कळविलें. सावरकराच्या साहसाला आपल्या योजनापूर्ण प्रयत्नांची जोड मिळाली तर सावरकरांची सुटका अद्यापहि होऊं शकेल, असें या मंडळींना वाटूं लागलें. सावरकरांची बोट कोणत्या मार्गानें जात आहे, ती कोणत्या बंदरात थांबण्याचा संभव आहे वगैरे गोष्टींचा या मंडळींनीं नीट अभ्यास केला आणि बोट मार्सेलिस बंदरांत ज्या दिवशीं यावयाची त्या दिवशीं बंदरांत योग्य त्या तजविजीनें हजर राहण्याचा त्यांनीं निश्चय केला. दि. ८-७-१० रोजीं मोरिया बोट मार्सेलिस बंदरांत उभी असताना सावरकरानीं बोटीच्या पोर्टहोल-मधून समुद्रांत उडी टाकली व पोहतपोहत ते किनाऱ्यावर पोंचले. पाठलाग करणाऱ्या शिपायांना टाळीत टाळीत सावरकर एका फ्रेंच पोलिस अधिकाऱ्या-पुढें दाखल झाले. थकलेल्या, एकाकी सावरकराना या अधिकाऱ्यानें पहारेकऱ्यांच्या हवाली केलें. मार्सेलिस बंदरावर या रोमांचकारी घटना घडत होत्या, त्या सुमारास अय्यरप्रभृति मंडळी मार्सेलिस येथे आलेलीहि होती. सावरकरांना फिरून अटक करून पहारेकऱ्यांनीं त्यांना मोरिया बोटींत खूप बंदोबस्तानें कोंडून ठेवल्यावर थोड्या वेळानें ही मंडळी बंदरावर दाखल झाली ! त्या वेळीं सावरकरानाहि कांहीं करणें शक्य नव्हतें व या मंडळींनाहि कांहीं उपाय योजणें शक्य नव्हतें !

सावरकरांना सोडविण्याचे सर्व प्रयत्न विफल झाले असें स्पष्टपणें दिसूं लागतांच अय्यर यांनीं हिंदुस्थानांत परत जाण्याचा विचार पक्का केला. ब्रिटिश हेरांचें त्यांच्यावर बारीक लक्ष होतें व ब्रिटिश हद्दींत अय्यर शिरतांच त्यांना अटक करण्याचा सरकारचा विचार होता. हा विचार हाणून पाडावयाचा व हिंदुस्थानलाहि पोंचावयाचें असें अय्यर यांनीं ठरविलें. हा विचार पार पाडण्यासाठीं अय्यर व त्यांची मित्रमंडळी यांनीं जी क्लृप्ति योजली ती कांहींशी निर्दयपणाचीहि भासण्यासारखी आहे. एक दिवस त्यांनीं पुष्कळशीं

पत्रें लिहिलीं. वराकनेरी येथें राहणाऱ्या भाग्यलक्ष्मीबाईंच्या नांवें हीं पत्रें लिहिलेलीं होतीं व त्यांत आपण अमेरिकेंत कोठें तरी संचारार्थ जात आहों असा मजकूर होता हीं पत्रें लिहून झाल्यावर अय्यर यानीं कित्येक पाकिटां-वरहि भाग्यलक्ष्मीबाईंचें नांव व पत्ता लिहून काढला. हीं पत्रें व पाकिटें त्यांनीं कामाबाईंच्या स्वाधीन केलीं. हा उद्योग एकीकडे चालू असतांना अय्यर यानीं दुसरी एक कला हस्तगत केली. त्यांना हिंदुस्तानी चांगलें बोलतां येत होतेंच. फकिराचा वेष धारण करून त्या वेषांतरांत हिंडण्याचा त्यानीं उपक्रम चालविला. दिवसचे दिवस घरांत बसून वेळ काढावयाचा, क्वचित् बाहेर पडावयाचें तर या वेषांतरात बाहेर पडावयाचें असा प्रकार अय्यर यांच्या बाबतींत घडल्यामुळें, त्याच्या पाळतीवर असलेल्या पोलिसांना अय्यर पॅरिस सोडून गेले असले पाहिजेत, असें वाटूं लागलें. कामाबाईंच्या स्वाधीन करून ठेवलेलीं पत्रें मधूनमधून पोस्टांत पडूं लागलीं. क्रांतिकारकाचा पत्र-व्यवहार उघडून पाहण्याला चटावलेल्या अधिकाऱ्याना या पत्रामुळें असें वाटू लागलें कीं, अय्यर यांची स्वारी पॅरिसमधून निघाली असून ती अमे-रिकेकडे चालली आहे. ब्रिटिश सरकारची दिशाभूल करण्याच्या दृष्टीनें अप्रतिम ठरलेली ही युक्ति दुसऱ्या एका दृष्टीनें मात्र फार तापदायक ठरली. भाग्यलक्ष्मीबाई आपल्या पतिराजाच्या वाटेकडे डोळे लावून बसलेल्या होत्या व त्यांच्या दर्शनासाठीं चातकाप्रमाणें उत्सुक झाल्या होत्या. स्वदेशीं परत येण्याऐवजीं आपले पतिराज आणखी दूरच गेले हें कळतांच, त्या साध्वीची चिंता शतगुणित झाली !

पॅरिसमध्यें वावरत असतांना अय्यर यांनीं फकीर म्हणून बेमालूमपणें समाजांत वावरण्याचा सराव केला हें खरें असलें तरी, पॅरिसमधून प्रत्यक्ष बाहेर पडतांना त्यांनीं या वेषांतराचा आश्रय केला नाहीं. रुस्तुमशेट हें नांव धारण करून व आपण एक पारशी गृहस्थ आहों असें वेषांतरावरून लोकांना भासवीत ते बोटींत बसले. बोटीवर जे युरोपियन उतारू होते त्यांच्याशीं ते लॅटिन भाषेंत बोलत व इतरांशीं बोलतांना ते हिंदुस्तानीचा आश्रय करीत. रोममधील मुक्कामांत ते फिरून फकीर बनले व याच वेषांत रोम शहर पाहून घेतल्यावर ते नेपल्स, कैरो, इस्तंबूल इत्यादि ठिकाणींहि गेले. इस्तंबूलमध्यें असतांना डोक्यावर तुर्की टोपी चढवून ते अगदीं पुरेपुरे फकीर झाले. या

वेषांतच ते मुंबईत आले व तेथून कोलंबोला गेले. कोलंबो येथें कांहीं दिवस राहिल्यावर ते प्रथम कडलोरला गेले व तेथून चालतचालत पाँदिचरीला गेले. ब्रिटिश हद्दींत राहणें त्याना शक्यच नव्हतें; म्हणून पाँदिचरी येथेंच राहण्याचें ठरवून त्यांनीं भाग्यलक्ष्मीबाईना पत्र लिहिलें व त्याना पाँदिचरी येथें बोलावून घेतलें.

सावरकर इंग्लंडला गेले तत्पूर्वी त्यांना झालेला प्रभाकर हा मुलगा जसा मध्यंतरींच्या काळांत देवीनें वारला होता, तद्वतच अय्यर यांची पहिली मुलगी पुट्टु हीहि १९०९ सालीं, भाग्यलक्ष्मीबाई बंगलोर येथें पशुपति अय्यर याच्या येथें रहात असतांना, हगवणीचा विकार होऊन देवाघरीं गेली होती. हें दुःख, पति कोणत्या स्थितींत परदेशांत दिवस काढीत आहे या विवंचनेची तीव्रता इत्यादि कारणांमुळें निर्जीव बनून गेलेल्या भाग्यलक्ष्मीबाई जेव्हां अय्यर याच्याबरोबर पांदिचरी येथें संसार करूं लागल्या तेव्हां त्या पांदिचरीच्या वनवासांतहि त्यांना स्वर्गसुखाचा अनुभव येऊं लागला. पाँदिचरी येथें अय्यर कुटुंबाचें वास्तव्य सुमारें ९–१० वर्षें होतें. या काळांत या कुटुंबाला अनेक आपत्तींना तोंड द्यावें लागलें व समाजाकडून होत असलेला अनेकविध छळ सोसावा लागला. पण, कुटुंबांतल्या माणसांची ताटातूट होण्याचा प्रसंग या काळांत न आल्यामुळें, भाग्यलक्ष्मीबाईंच्या दृष्टीनें हा काळ पुष्कळ समाधानांत गेला.

ईश्वर धर्मराज स्ट्रीट या पाँदिचरी शहराच्या भागांत अय्यर कुटुंब रहात होतें. हळूहळू अय्यर यांची दृष्टि आपल्या कामाकडे वळूं लागली. एका उद्यानांत तरुण गोळा करून ते त्यांना गुप्तपणें क्रांतिकारक पंथाची दीक्षा देऊं लागले. हातांत नग्न खड्ग घेऊन चंडीची पूजा करणारे व 'जय चंडी' हा मंत्र जपणारे अय्यर शीखांचे गुरु गोविंद यांचें अनुकरण करीत असल्याचा भास होत असे. अय्यर यांनीं दीक्षा देऊन तयार केलेला एक तरुण, शाक्त ब्राह्मण वांचिनाथ यानें त्या काळांत केलेलें एक कृत्य संस्मरणीय आहे. त्या काळातले मद्रास प्रांतांतले पुढारी श्री. चिदंबरम् पिल्ले यांना ॲश नांवाच्या इंग्रज कलेक्टरानें सक्त मजुरीची शिक्षा ठोठावली होती. हा कलेक्टर आपल्या बायकोला बरोबर घेऊन उन्हाळ्याच्या दिवसांत कोडाईकनाल हिल्स या आरामशीर जागीं चालला होता. एका मोठ्या

स्टेशनवर गाडी उभी असतांना वांचिनाथ साहेबाच्या डब्यांत शिरला. पिस्तूल झाडून त्यानें साहेबाला गारद केला आणि पायखान्यांत शिरून स्वतःवरहि पिस्तूल झाडून त्यानें आत्महत्या केली. वांचिनाथसारखा एक साधासीधा कारकून या साहसाला कसा प्रवृत्त झाला या प्रश्नाची शहानिशा सुरू झाली व हा कारकून अय्यर–संप्रदायी होता, हें सरकारच्या दृष्टोत्पत्तीस आलें.

यानंतरचीं कांहीं वर्षें अय्यर यांना फार त्रासात काढावीं लागलीं. ब्रिटिश सरकारचे पादिचरी येथील हस्तक त्यांना नाना प्रकारांनीं छळीत असत आणि त्यांना ब्रिटिश हद्दींत गाठून पकडावें कसें या उद्योगांत ते सतत गढलेले असत. अय्यर याचा छळ कसा झाला, या छळाला तोंड देताना अय्यर याचें धैर्य, त्यांच्या अंगीं असलेला समयसूचकपणा वगैरे गुण कसे सिद्ध झाले वगैरे संबंधींच्या कांहीं गोष्टी मजेदार व रोमांचकारी आहेत.

अय्यर याना पकडून देणाऱ्या इसमाला दहा हजार रुपये बक्षीस मिळतील असें सरकारनें जाहीर केलें होतें. यामुळें वल्लभदास नांवाच्या एका पुंजीपतीच्या तोंडाला पाणी सुटलें व त्यानें अय्यर याना गोत्यात आणण्याचे अनेक प्रयत्न केले. अय्यर याच्यासारखा पेहराव करावा, त्यांच्या आवाजाची नक्कल करावी, त्यांच्या घराचें दार बंद असलें कीं तें ठोठवावें आणि दार उघडल्याबरोबर घरात शिरून राजद्रोहात्मक पत्रकें, हत्यारें वगैरे वस्तू सांपडतात कीं काय याचा शोध घ्यावा, असे प्रकार दुष्ट माणसांनीं सारखे सुरू केले. तेव्हा अय्यर व भाग्यलक्ष्मीबाई यांनीं संकेत ठरविला. दरवाज्यावर एका विशिष्ट प्रकारानें थाप पडली तरच अय्यर आले असें समजून भाग्यलक्ष्मीबाई दार उघडूं लागल्या. तेव्हां आगंतुक फुकट फौजदार फजीत होऊं लागले.

एकदां अय्यर हे समुद्रकांठच्या एका रस्त्यानें एकटेच फिरत चालले होते. त्यांच्या पाळतीवर असलेले हेर व त्याचे हुल्लडबाज भाडोत्री हस्तक यांनीं त्यांना गराडा घातला. या हिकमती मंडळींनीं जवळच एक बैलगाडी तयार ठेवली होती. अय्यर यांना रेटीत रेटीत गाडीजवळ न्यावयाचें, त्यांना गाडींत कोंबावयाचें आणि मग त्यांना ब्रिटिश हद्दींत नेऊन पोलिसाच्या स्वाधीन करावयाचें असा या मंडळींचा संकल्प होता. अय्यर यांनीं हें कारस्थान ओळखलें व ते बोळाबोळांतून पळत सुटले. वाटेंतल्या एका गणपतिमंदिरांत अय्यर

तीरासारखे केव्हां शिरले हें त्यांच्या मागें लागलेल्या लोकांना समजलेंहि नाहीं. दक्षिण भारतांतलीं मंदिरेंहि अवाढव्य आणि त्या मंदिरांतल्या मूर्तीहि खूप मोठ्या! भव्य अशा विनायकमूर्तीच्या मागें अय्यर दडून राहिले. दर्शनासाठीं व पूजेसाठीं आलेल्या भक्तांनीं गजाननाच्या मस्तकावर वाहिलेलीं फुलें मधून-मधून अय्यर यांच्या अंगावर पडत होतीं. संध्याकाळच्या कांहीं घटका व सारी रात्र अय्यर हे गणेशमूर्तीच्या पाठीशीं उभे होते. उजाडल्यावर ते सुखरूप घरीं पोंचले.

एकदां पांदिचरी शहरांत निवडणुकीची धामधूम सुरू होती. तिचा फायदा घेऊन कांहीं टोळभैरव अय्यर याच्या घरात घुसूं पहात होते. दुपारचीं जेवणें चाललीं होतीं. दारावर जोरजोरानें धक्के बसूं लागले तेव्हां भाग्यलक्ष्मीबाईंनीं घरांतली उखळी, जातें वगैरे जड वस्तू दाराला टेंकून ठेवल्या. अय्यर घाई-घाईनें जेवणावरून उठले. घरांतल्या महत्त्वाच्या वस्तू गोळा करून त्या त्यांनीं जवळ घेतल्या आणि कौलारावरून चालतचालत ते मधलीं दोन घरें टाकून पलीकडच्या घरीं गेले. हें घर त्यांच्या एका मित्राचें होतें. कौलें बाजूला सारून ते या मित्राच्या घरांत शिरले. जवळच्या वस्तू त्यांनीं तेथें ठेवल्या आणि कौलारावरूनच ते घरीं परत आले. छोटी मुलगी सुभद्रा हिला स्वतः अय्यर यांनीं खांद्यावर घेतली व कौलाराच्या रस्त्यानें हीं सर्व माणसें त्या मित्राच्या घरीं जाऊन पोंचलीं.

अय्यर याचें अशा घातकी गुंडांपासून रक्षण व्हावें म्हणून एकदां जी युक्ति लढविण्यांत आली ती तर फारच विचित्र होती. एका मित्राच्या घरीं अय्यर बसले आहेत असा पक्का तपास लागल्यावर, गुंडांनीं त्या घराभोंवतीं गोळा होण्याला हळूहळू प्रारंभ केला. संकटग्रस्त माणसाचें संकटेंद्रिय (Danger-consciousness) तीक्ष्ण बनतें हा सर्वत्र येणारा अनुभव अय्यर यांच्याहि बाबतींत आला होता व गुंडांच्या हालचालींची पहिली कल्पना येतांच त्यांनीं पुढच्या संकटाचें सगळें स्वरूप ओळखलें. आपल्या मित्राशीं अय्यर यांनीं कांहीं हितगुज केलें आणि थोडक्याच वेळांत त्या घराचें स्वरूप पार पालटलें. घरांतलें कोणी तरी माणूस मेलें म्हणजे घराला जी अवकळा येते ती अवकळा त्या घरावर पसरली. घरांतून रडारड ऐकूं येत आहे, घराच्या पुढच्या भागांत बसून कांहीं मंडळी हुंदके देत आहेत व इतर मंडळी

तोंड म्लान करून बसली आहेत असें दृश्य त्या ठिकाणीं दिसूं लागलें. प्रेत स्मशानांत नेण्यासाठीं जें सामान लागतें तेंहि थोड्या वेळांत घरासमोर दिसूं लागलें. सगळें नाटक अशा रीतीनें सिद्ध झाल्यावर अय्यर याना तिरडीवर ठेवण्यांत आलें व बोळाबोळांतून तिरडी नेल्यावर एका सुरक्षित जागीं त्यांना सोडण्यात आलें.

अय्यर याच्या घरांत काम करणारी पार्वती ही मोलकरीण फार विश्वासु होती व घरातलीं माणसेंहि तिला आदरानें वागवीत असत. या गरीब मोलकरणीवर द्रव्याचा मोहनीमंत्र लागू करतां येईल व मग अय्यर यांना खड्डयात टाकणें सुसाध्य होईल अशी अय्यर यांच्या शत्रूंची समजूत झाल्यामुळें त्यानीं तो प्रयोग करून पाहिला. पण, गरीब माणसेंच किती प्रामाणिक नि नेकजात असतात हें या प्रसंगीं उत्तम प्रकारें सिद्ध झालें. पार्वती या मोहात तर सापडली नाहींच; उलट, आपल्या धन्याच्या वाइटावर किती माणसें आहेत याची कल्पना आल्यामुळें ती अधिकच दक्षतेनें वागूं लागली. घराच्या आवारातल्या विहिरींतलें पाणी ओढीत असताना, पार्वतीबाईना पाण्यांत पडलेली एक सीलबंद बरणी दिसली. स्वतः बरणी बाहेर काढण्याचा प्रयत्न करणें त्यांना बरें वाटलें नाहीं. म्हणून त्यांनीं खुद्द अय्यर याना बोलावून घेतलें. पाण्यांत एक बादली सोडून अय्यर यांनीं ती बरणी अलगत बाहेर काढली. दहशतवादी म्हणून प्रसिद्ध असलेल्या पांदिचरी येथील सगळ्या इसमांच्या ज्यावर स्वाक्षऱ्या आहेत असलें एक राजद्रोही पत्रक, एक सुरा, कांहीं रासायनिक द्रव्यें इत्यादि पदार्थ या बरणींत सांपडले. या सर्व वस्तु घेऊन अय्यर यांनीं पांदिचरी येथील फ्रेंच गव्हर्नरची भेट घेतली व त्या वस्तू त्याच्या स्वाधीन करून त्यांनीं त्याला सगळी हकीगत सांगितली. विहिरींत आक्षेपाई पदार्थ नक्की सांपडणार अशा खात्रीनें पोलिस झडती घेण्यासाठीं आले; पण, फजीत होऊन त्यांना हात हालवीत परत जावें लागलें.

१९१४ च्या पावसाळ्यांत पहिलें महायुद्ध सुरू झालें. त्यानंतर थोडक्याच दिवसांत एमडेन या जर्मन पाणबुडीचा धुमाकूळ अरबी समुद्रांत नि बंगालच्या उपसागरात सुरू झाला. अय्यर यांच्या क्रांतिकारक चळवळी नि हा धुमाकूळ यांचा संबंध असलाच पाहिजे असें मद्रासमधल्या सरकारी अधि-

कार्‍यांनीं समीकरण ठरविलें. पांदिचरी येथें आश्रय घेऊन राहिलेले श्री. अरविंद घोष, श्री. अय्यर प्रभृति हिंदी देशभक्तांना फ्रेंच सरकारनें हद्दपार करावें असा लकडा फ्रान्सच्या मागें लावण्यांत आला. एकीकडे हद्दपारीचें भय व दुसरीकडे गुप्त पोलिसांचा ससेमिरा अशा मार्‍यात अय्यर यांनीं कित्येक दिवस काढले. अल्जीरिया या फ्रेंच वसाहतींत अय्यर व अरविंद घोष यांना डांबून ठेवण्यांत येणार आहे अशी अफवा त्या काळांत सर्वत्र फैलावली होती. खर्चासाठीं वीस हजार रुपये फ्रेंच सरकार मंजूर करील तर मी अल्जिरियामध्येंहि जाऊन राहीन असें उत्तर अय्यर यांनीं पादिचरीच्या फ्रेंच गव्हर्नरला दिलें. ही रक्कम जड वाटल्यामुळें असो कीं अन्य काहीं कारणामुळें असो, अय्यर याना अल्जीरियामध्यें धाडण्यात आलें नाहीं, हें खरें.

ब्रिटिश सरकारच्या हेरखात्याकडून सतत होणारा छळ, महायुद्ध सुरू झाल्यामुळें स्वदेशाच्या भवितव्याबद्दल मनात उद्‌भवणारे विचारकल्लोळ, हद्दपार व्हावें लागतें कीं काय या भीतीची लटकती तलवार या अनेकविध तापातून मनाची मुक्तता व्हावी म्हणून अय्यर यांनीं स्वतःच्या मागें एक श्रेष्ठ दर्जाचा उद्योग लावून घेतला. तामीळ वाङ्मयांतला ग्रंथराज तिरुककुरल याचें भाषातर करण्याचा उपक्रम त्यांनीं सुरू केला आणि १९१४ च्या नोव्हेंबर–डिसेंबरपासून पुढें सहासात महिने अविश्रात उद्योग करून त्यानीं हें काम पुरें केलें, यापुढील पांदिचरी येथील वास्तव्याच्या चारपाच वर्षांच्या अवधींतहि अय्यर यांनीं काहीं साहित्यसेवा केली. तामीळ भाषेंतला महाकवि कंबन याच्या नांवानें अय्यर यांनीं एक प्रकाशनसंस्था सुरू केली आणि कंबन कवीच्या बालकांडरामायणाची सुधारून तयार केलेली आवृत्ति त्यानीं प्रकाशित केली.

१९१४ सालीं आफ्रिकेहून स्वदेशीं परत आल्यावर गांधीजींनीं सगळ्या हिंदुस्थानभर दौरा काढला होता. या दौर्‍यांत ते पांदिचरी येथें गेले असतां त्यांची अय्यर यांच्याशीं मुलाखत झाली. अहिंसावादाचे निस्सीम पुरस्कर्ते गांधीजी आणि आत्यंतिक अहिंसेचे सामाजिक व राष्ट्रीय दुष्परिणाम पूर्णत्वानें ओळखणारे सावरकर-अय्यर प्रभृति हिंदी क्रांतिकारक यांच्यामध्यें लंडनमधील वास्तव्यांत भरपूर चर्चा झालेली होती. हाच विषय याहि वेळच्या चर्चेंत गांधीजींनीं घुसळून काढला. गांधीजींचें मोठेपण मान्य केल्यावर आणि त्यांच्या

अहिंसा तत्त्वाचा प्रयोग होऊं देण्याला संमति दिल्यावर, अय्यर यांनीं स्वतः-जवळचें खड्ग हातीं घेतलें व त्या खड्गाकडे नजर वळवून ते गांधीजींना म्हणाले: अहिंसा अपुरी पडली किंवा फसली तर स्वराज्यप्राप्तीचा हा जवळच मार्ग सिद्धच आहे.

मॉंटफर्ड सुधारणाचें स्वागत हिंदुस्थानांत चांगल्या प्रकारें व्हावें या हेतूनें मॉंटेग्युसाहेबांनीं ज्या कित्येक गोष्टी धोरणीपणानें केल्या त्यांत राजबंदींची मुक्तता ही एक महत्त्वाची गोष्ट होती. १९१९ मध्यें बादशहांच्या नांवानें एक जाहीरनामा काढण्यांत आला. राजबंद्यांना मुक्त करण्याचा आदेश हिंदु-स्थानसरकारला देण्यांत आला. या आदेशानुसार जे अनेक राजबंदी निर्बंध-मुक्त झाले त्यांत अय्यर हेहि होते. पांदिचरी येथें कोंडून पडणें अतःपर अवश्य नसल्यामुळें अय्यर हे आपली पत्नी, आपली मुलगी सुभद्रा व आपला मुलगा कृष्णमूर्ति यांच्यासह मद्रासेस येऊन राहिले. मद्रासला कुटुंबाची सर्व व्यवस्था लावल्यावर अय्यर हे हिंदुस्थानच्या दौऱ्यावर निघाले. १९२० च्या मे महिन्याचा शेवटीं बनारस येथें ऑ. इं. कॉं. कमिटीची सभा झाली त्या वेळीं अय्यर तेथे होते. पांदिचरी येथें राहिल्यापासून अय्यर हे मधूनमधून लोकमान्य टिळकांपाशीं पत्रव्यवहार करीतच असत. या सभेच्या प्रसंगीं लोकमान्य बनारस येथें गेले असल्यामुळें, अय्यर याना त्यांच्या प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ मिळला.

देशपर्यटन पुरें झाल्यावर अय्यर मद्रासला आले. त्यांचें विस्तृत वाचन आणि मूलगामी विचारपद्धति यांचा लोकांना लाभ व्हावा म्हणून, त्या वेळीं मद्रास येथें निघत असलेल्या 'देशभक्त' या तामिळ दैनिकाच्या संपादका-ची जागा त्यांना देण्यांत आली. असहकाराच्या चळवळीचें फळ म्हणून त्यांना नऊ महिने कारावासाची शिक्षा भोगावी लागली. बेलारी येथील कारागृहांत हा अवधि त्यांनीं घालविला व या मुदतींतहि त्यांनीं कांहीं स्वतंत्र लेखनकार्य केलें. बंधमुक्त झाल्यावर अय्यर यानीं दाक्षिणभारतांतलीं हंपी—विरुपाक्ष वगैरे प्रसिद्ध ठिकाणें पाहिलीं. या प्रवासांत भाग्यलक्ष्मीबाई व मुलें हींहि अय्यर यांच्याबरोबर होतीं. तिनेवेल्ली जिल्हा कॉंग्रेसतर्फें बोलावण्यांत आलेल्या जाहीर परिषदेच्या अध्यक्षस्थानीं अय्यर यांची योजना करण्यांत आली होती. ते आपल्या अध्यक्षीय भाषणाला प्रारंभ करणार तोंच त्यांच्यावर क्रि. प्रो.

कोडच्या १४४ कलमान्वयें भाषणबंदीची आज्ञा बजावण्यांत आली. सरकारच्या या कृत्याचा निषेध म्हणून हें अधिवेशन निःशब्द रीतीनें पुरें करण्यांत आलें.

स्वराज्यपक्षीय काँग्रेसवाल्यानीं विधिमंडळांतून प्रवेश केल्यावर प्रामाणिक काँग्रेसकार्यकर्त्यांना राष्ट्रीय शाळा हेंच कार्यक्षेत्र शिल्लक उरलें होतें आणि शिक्षण हा आचार्य अय्यर यांचा फार आवडता विषय होता. म्हणून त्यानीं कलाडाई कुरुची येथील राष्ट्रीय शाळा चालविण्याचें काम मोठ्या आनंदानें व उत्साहानें पत्करलें. भारताच्या प्राचीन परंपरेचा अभिमान बाळगणाऱ्या अय्यर यांच्या मनात प्राचीन काळच्या गुरुकुलाचें महत्त्व व वैभव या कल्पना घोळूं लागल्या. या कल्पना ते आपल्या अनेक मित्रांपाशीं बोलून दाखवीत असत. त्याच्या मित्रपरिवारातला एकजण सधन व्यापारी होता. अय्यर यांना गुरुकुल स्थापण्याच्या दृष्टीनें अनुकूलता लाभावी म्हणून या मित्रानें ताम्रवर्णी नदीच्या कांठच्या शर्मादेवी गावाजवळ तीस एकर जमीन विकत घेऊन दिली.

या ठिकाणीं आचार्य अय्यर समाधानानें अध्ययन-अध्यापनाचें काम करूं लागले. भोंवतालीं जमलेल्या बटूंची सर्वांगीण उन्नति कशी होईल या विचारांत ते तन्मयतेनें लक्ष घालूं लागले. आचार्य अय्यर याचें ‘ तामीळ गुरुकुल ’ ही एक नमुनेदार संस्था म्हणून नादूं लागली. मद्रास प्रातांतल्या ब्राह्मणेतर चळवळीच्या पुरस्कर्त्यांपैकीं कित्येकानीं या गुरुकुलावर ‘ब्राह्मणी संस्था’ म्हणून आग पाखडण्याला कमी केलें नाहीं. अय्यर याना यामुळें बराच मनःस्ताप झाला; पण, तो गिळून त्यांनीं आपलें कार्य पुढें चालू ठेविलें. तामिळ गुरुकुलाला जोडून त्यानीं एक मुद्रणालय काढलें. पूर्वीच्या ‘अभिनव भारत ’ संस्थेचें स्मरण अय्यर याच्या मनांत जागृत असल्यामुळें त्यांनीं या मुद्रणालयांतून जें नियतकालिक प्रसिद्ध करण्याला सुरुवात केली त्याचें नांव त्यांनीं ‘ बालभारती ’ असें ठेविलें.

सावरकर बंधमुक्त झाले आहेत व त्यांना रत्नागिरी येथें स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें आहे हें कळल्यापासून सावरकरांना भेटण्याला अय्यर उत्सुक झाले होते. पण, प्रासंगिक व तात्कालिक कर्तव्यें बाजूला सारून रत्नागिरीस जाणें त्यांना शक्य नव्हतें. पण, वर्षाअखेर होणारें काँग्रेसचें अधिवेशन या वर्षी बेळगांव मुक्कामीं होत आहे व तेथून रत्नागिरीस जाणें सुकर आहे असें

दिसतांच अय्यर बेळगांवास गेले. तेथें त्यांनीं कॅाँग्रेस व हिंदुसभा या दोहोंचीं अधिवेशनें पाहिलीं व अधिवेशनें खलास होताच ते कोल्हापूरमार्गें रत्नागिरीस आले. १९२५ च्या अगदीं आरंभीं सावरकर व अय्यर याची सावरकरांच्या रत्नागिरी येथील निवासस्थानीं भेट झाली. अय्यर हे रत्नागिरीस दोनतीन दिवसच होते. एकटे सावरकर रत्नागिरीस होते तर तेथल्या गुप्तपोलिसखात्याला केवढा तरी धाक वाटत असे ! आतां तर अव्वल दर्जाचे हे दोन क्रांतिकारक एकत्र राहिले होते. त्यामुळें, अय्यर हे दोनतीनच दिवस रत्नागिरीस होते त्या अवधींत, तेथील गुप्तपोलिसांना किती दक्ष रहावें लागलें असेल नि किती कष्ट करावे लागले असतील याची कल्पना सहज करतां येण्यासारखी आहे. पूर्वीच्या सहवासाच्या स्मृती ताज्यातवान्या कराव्या, परस्परांचा वियोग झाल्यापासून जो सुमारें पंधरा वर्षांचा काळ निघून गेला होता त्यांतले हर्षामर्षांचे प्रसंग एकमेकांना निवेदावे, पूर्ण विचार करून जीं राजकारणाचीं तत्त्वें ठरविलीं त्यांच्या तुलनेनें प्रस्तुत काय घडत आहे याचा विचार करावा, अशा पद्धतीनें कालक्षेप होत असताना सावरकर-अय्यर सहवासाचे हे दोनतीन दिवस भुर्-दिशीं निघून गेले.

बेळगाव-रत्नागिरीकडून अय्यर आपल्या तामिळ गुरुकुलांत परत आले व गुरुकुलांतली नित्यनैमित्तिक कामेंहि ते करूं लागले; पण, त्याचें मन कामा-ध्यामांत रमेना. आपलें इहलोकांतलें कार्य संपत आलें आहे असें त्यांचें त्यांनाच वाटूं लागलें. मनांत अशी जाणीव नांदूं लागली म्हणजे मनुष्याच्या वर्तनांत जो उदासीनपणा न कळत प्रतिबिंबित होतो तो अय्यर यांच्या वर्त-नांत प्रतिबिंबित होऊं लागला. कार्याचा व्याप वाढविण्यापेक्षां तो आवरण्या-कडे त्यांच्या मनाचा कल वाढूं लागला. त्यांच्या वृत्तींतला क्षमाशीलपणा व प्रेमळपणा उत्कर्ष पावूं लागला. हें मानसिक स्थित्यंतर घडत असतांना वर्ष-सव्वा वर्ष कसें निघून गेलें हें कोणाच्याच फारसें लक्षांत आलें नाहीं.

१९२६ च्या पूर्वार्धांत एकदां असें घडलें कीं, गुरुकुलांतल्या कांहीं विद्यार्थ्यांच्या मनात सहलीसाठीं बाहेर पडण्याचा विचार आला. कुलपति अय्यर यांच्या कानावर त्यांनीं आपला विचार घातला. मलबार प्रांताच्या सरहद्दीनजीक कल्याणी धबधबा आहे. तो पहावा व त्याच्या भोवताली नांदत

असलेल्या सृष्टिसौंदर्याचा आस्वाद घ्यावा असें गुरुकुलांतल्या बटूंनीं ठरविलें. कुलपतींची कन्या सुभद्रा हिला हें सगळें कळलें. तिचेंहि वय गुरुकुलांतल्या पुष्कळशा बटूंच्या बरोबरीचेंच होतें. आपणहि या सहलींत सामील व्हावें असें तिला वाटूं लागलें. तिनें आपल्या पिताजींना आपला बेत सांगितला. मुलेंमुलेंच सहलीला जात आहेत, त्यांच्याबरोबर सुभद्रेला धाडूं नये असें अय्यर यांना वाटलें. त्यांनीं सुभद्रेला तसें सांगितलें. ती ऐकेना तेव्हां ते तिच्यावर रुष्टहि झाले.

स्त्रीहट्ट, बालहट्ट इत्यादींना तोंड देण्याचा प्रसंग आला कीं, धीरोदात्त पुरुषहि गोंधळून चुका करितात. कांचनमृगाचा हट्ट सीतामाईनीं धरला व तो पुरा करण्याचा प्रसंग रामरायावर आला. यामुळें कोणते अनर्थ ओढवले हें रामायणकथा आक्रोशपूर्वक सांगतच आहे. आवडती मुलगी सुभद्रा हिचा हट्ट पुरविण्याचें अय्यर यांनीं शेवटीं मान्य केलें व ही मान्यता शेवटीं अनर्थाला कारणीभूत झाली. सहलीला गुरुकुलांतले बटू निघून गेल्याच्या दुसऱ्या दिवशीं सुभद्रेला बरोबर घेऊन अय्यर निघाले व बटूंचा मुक्काम ज्या ठिकाणीं होता त्या ठिकाणीं येऊन पोंचले. या ठिकाणीं बटूंच्या समवेत कांहीं वेळ घालविल्यावर ही सर्व मंडळी तेथून पुढें जावयास निघाली.

कल्याणी धबधब्याच्या पाण्याचे जे अनेक प्रवाह झाले आहेत त्यांतल्या एका प्रवाहाच्या कांठीं ही सर्व मंडळी येऊन पोंचली. या ठिकाणीं पाण्याला ओढ फार होती. त्यामुळें प्रवाहांतून सरळ पलीकडे जाणें धोक्याचें होतें. एका निमुळत्या, चिंचोळ्या जागेवरून अलगत उड्या मारून पलीकडे जाणें हाच त्यांतल्या त्यांत सुरक्षितपणाचा मार्ग होता. बरोबरच्या बटूंनीं ही सर्व परिस्थिति पाहिली व ते एकामागून एक असे सगळेजण त्या ठिकाणावरून उड्या मारून प्रवाहपार झाले. सुभद्रेच्या अंगांत आवेश संचारला. मीहि अशीच उडी मारून पलीकडे जातें असें ती आपल्या पिताजींना म्हणूं लागली. बटूंना जें साधलें तें तुला साधेल असें समजूं नको, हा अविचार करूं नको, असें अय्यर तिला परोपरीनें सांगत होते. पण, पिताजींच्या या सांगण्याचा सुभद्रेनें भलताच अर्थ करून टाकिला. मुलांच्या अंगीं जें साहस आहे तें आपल्या अंगीं नाहीं असा पिताजींच्या म्हणण्याचा आशय आहे

असा तिच्या मनाचा ठाम ग्रह झाला नि ती मानी मुलगी त्यामुळें अधिकच निग्रही बनली.

सुभद्रेनें आवेशानें उडी झोंकली; पण तिला तोल नीटपणीं सांभाळतां आला नाहीं. अरुंद जागेतून वाहणाऱ्या त्या जलप्रवाहांत तिचें शरीर पडलें. या जागीं पाणी खोलहि होतें नि पाण्याला ओढहि फार भयंकर होती. त्यामुळें डोळयाचें पातें लवतें न लवतें तों सुभद्रा वहातवहात खालींखालीं जाऊं लागली. अय्यर यांच्या ध्यानांत ही गोष्ट येतांच ते पुढें झाले. मुलीला वाचविण्याची पराकाष्ठा करावयाची असें मनानें ठरवून त्यांनींहि पाण्यांत उडी झोंकली. पण, सुभद्रा त्यांच्या हातीं लागावयाची ती बाजूलाच राहून स्वतः अय्यरच अगतिकपणें वहातीला लागले. पुढें गेलेल्या बटूंच्या ही गोष्ट ध्यानात आली व त्यानीं एकच आरडाओरड केली. ते तरी बिचारे त्या दारुण परिस्थितींत दुसरें काय करूं शकणार होते! ही बातमी चौफेर पसरली व सगळया बाजूंनीं शोध सुरू झाला! शेवटीं तिसऱ्या दिवशीं अय्यर व त्यांची सुभद्रा यांचीं प्रेतें लोकांच्या हातीं लागलीं. अय्यर याचें शरीर इतकें छिन्न-भिन्न झालें होतें नि त्यांचा चेहरा इतका विद्रूप झाला होता कीं प्रेत त्याचेंच आहे हें केवळ अनुमानानें ओळखावें लागलें!

भाग्यलक्ष्मीबाई या आपल्या पतीच्या निधनानंतर कांहीं वर्षे हयात होत्या. अय्यर याचे चिरंजीव कृष्णमूर्ति हे डॉक्टर आहेत. त्रिचनापल्ली जिल्ह्यांत त्याचें वास्तव्य आहे. त्यांच्या एका छोकऱ्याचें नांव दुष्यन्त असें आहे.

लंडन येथील वास्तव्यांत अय्यर यांनीं दाढी वाढविली व त्यामुळें सावर-कर हे त्यांना ऋषीजी या लाडक्या टोपण नांवानें संबोधूं लागले. अय्यर याची लीन वृत्ति, त्यांचें विशुद्ध चारित्र्य, त्यांची ज्ञानलालसा या सर्वांचा विचार केला तर असें म्हणावें लागेल कीं सावरकरांनीं त्यांना विनोदानें दिलेलें हें नांव पूर्णतया सार्थ असेंच होतें. अय्यर यांच्या आकस्मिक मृत्यूची बातमी कळली तेव्हां सावरकर फार हळहळले! 'मराठा' या इंग्रजी साप्ताहिकांत एक लेख लिहून, त्या वेळच्या परिस्थितींत जेवढें सांगणें शक्य होतें तेवढें अय्यर यांच्याबद्दलचें वृत्त लोकांना सांगून सावरकर यांनीं स्नेहऋण फेडण्याचा प्रयत्न केला.

× × ×

वृत्तींत रुतून राहिलेल्या नि मुरून गेलेल्या लीनपणामुळें माणसें स्वतःची योग्यता, वास्तविक ती असते त्यापेक्षां, फार कमी मानतात. अय्यर हे जरा कमी लीन असते आणि अधिक महत्त्वाकांक्षी असते तर गांधीयुग सुरू झाल्यानंतरहि मद्रासप्रांताचें राजकारणी नेतृत्व ते करूं शकले असते. राजाजी, सत्यमूर्ती, श्रीनिवास आयंगार, डॉ. राजन्, पट्टाभी इत्यादि व्यक्ति दक्षिण-भारतांतल्या राजकारणांत त्या काळांत चमकून नेतृत्वपदीं विराजून गेल्या व अद्याप विराजत आहेत. या व्यक्तींपैकीं कोणत्याहि व्यक्तीच्या बरोबरीची योग्यता अय्यर यांची खासच होती. पण, आपण नेते नाहीं ही भावना पूज्य सेनापति तात्याराव बापट यांच्या वृत्तींत सतत वागत असल्यामुळें त्यांच्या जीवनप्रवाहाला जसें एक विशिष्ट वळण लागलें तद्वतच अय्यर यांच्याहि जीवनाला एक विशिष्ट वळण लागलें. असें असलें तरी, सेनापतींना जसें महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनांत अढल, उच्च स्थान प्राप्त झालेलें आहे तद्वतच अय्यर यांनाहि त्यांच्या प्रांताच्या सार्वजनिक जीवनांत अढळ स्थान प्राप्त झालें आहे.